









नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५१ । अंक १२ । सप्टेंबर १९९८
भाद्रपद-अश्विन, शके १९२०
किंमत रु. १५/-
वार्षिक वर्गणी रु. १६०/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

**या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.**

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन



अनुक्रमणिका

# अण्वस्त्रे आणि भारताचे संरक्षण

– १ –

भारताने अण्वस्त्रांच्या चाचण्या केल्या त्याला आता चार महिने होऊन गेले. चाचण्या पार पडल्या पडल्या बहुसंख्य भारतीय सुशिक्षित मध्यमवर्गीयांची छाती आत्मगौरवाने भरून आली. वर्तमानपत्रांमधील अनेकानेक लेखांमधून त्याचा पडताळा मिळत राहिला. भाजपच्या नेतृत्वाखालील कमालीच्या अस्थिर आघाडी सरकारने याचे श्रेय जेवढे स्वतःकडे घेता आले तेवढे घेतले. विशेषकरून भाजपच्या नेत्यांनी. सावरकर व रा.स्व. संघ यांना अनुसरणारी मंडळी नेहमीच शस्त्रपूजक व बलोपासक राहिली आहेत. अण्वस्त्र चाचण्यांचे यश त्यांनी विशेष समाधानाने व गौरवाने मिरवावे हे स्वाभाविकच होते. आता ते उत्साही आत्मगौरवाचे वातावरण निवळले आहे. अण्वस्त्र चाचण्यांमुळे स्वतःवर भारताने ओढवून घेतलेल्या विभिन्न परिणामांना सामोरे जाण्याचे दिवस सुरू झाले आहेत.

भारतावर अण्वस्त्रधारी राष्ट्रांनी जे वेगवेगळे निर्बंध लादले आहेत त्यांची एका मर्यादेपलीकडे फार चिंता करण्याचे कारण नाही. कम्युनिस्ट चीनचे उदाहरण आपल्या डोळ्यासमोर आहे. अमेरिकेला वर्षानुवर्षे धाब्यावर बसवून, अमेरिकेचे कट्टर शत्रुत्व करून आंतरराष्ट्रीय राजकारण केलेल्या चीनबरोबर अमेरिकेचे संबंध घरोब्याचे होण्यासाठी फार त्रास पडलेला नाही. भारताचे आर्थिक कंबरडेच पार मोडेल इतके कठोर जाचक निर्बंध लादले जाणार नाहीत ही गोष्ट आजच स्पष्ट झाली आहे. मास्तरांनी सौम्य शिक्षा करावी तसला प्रकार आहे. कालांतराने हा मामलाही निवळेल.

भारताचा समावेश आता अण्वस्त्रधारी राष्ट्रांमध्ये झाला आहे. जगातल्या राष्ट्रांमध्ये एक चातुर्वर्ण्यव्यवस्था अस्तित्वात आहे. अनेक राष्ट्रे इतकी लहान आकाराची, लहान लोकसंख्येची आहेत की ती कायम खालच्या पायरीवरच राहणार. सर्वात वरिष्ठ आहेत अण्वस्त्रधारी महासत्ता. दीर्घकालपावेतो अमेरिका व सोविएत रशिया या दोन महासत्ता आर्थिकदृष्ट्याही बलिष्ठ व राजकीयदृष्ट्याही दहशत घालण्याइतक्या शक्तिशाली होत्या. त्यांनी जगाची आपापल्या प्रभावक्षेत्रात विभागणी केली होती. अण्वस्त्रांच्या आधारे या दोन महासत्तांनी आपापसात एक सर्वसंहारक भयाचे संतुलन (बॅलन्स ऑफ टेरर) प्रस्थापित केले होते. यांच्या अधिकाराला न जुमानता नंतरच्या काळात फ्रान्स व चीन यांनी प्रथम, नंतर इंग्लंडने (बहुधा अमेरिकेच्या संमतीसह) अण्वस्त्रे निर्माण केली. या दोन महासत्तांना नाखुषीनेच पण या वास्तवाशी जुळवून घ्यावे लागले. सोविएत रशियाच्या विघटनानंतर जगात अमेरिका ही एकच महासत्ता उरली असे चित्र काही काळ निर्माण झाले. सोविएत रशिया होता तोवर पश्चिमी जगातल्या बड्या राष्ट्रांना पण अमेरिकेचे अग्रेसरत्व ('फर्स्ट अमंग इक्वल्स') स्वीकारणे व्यवहारात गरजेचे व सोयीचे वाटत होते. सोविएत रशियाच्या विघटनानंतर त्यांनी अमेरिकेला हे विशेष उच्च स्थान देण्याचे नाकारले आहे. अमेरिका व ही राष्ट्रे यांच्यात आज एक ताण व स्पर्धा आपण पाहू शकतो. अमेरिका, रशिया, फ्रान्स, इंग्लंड व चीन ही पाच बऱ्यापैकी अण्वस्त्रे बाळगणारी राष्ट्रे आहेत. जर्मनी व जपान यांच्यावर सैन्य न बाळगण्याचेच दीर्घकाळ बंधन होते. आज यांची सैन्ये आहेत. यांना अण्वस्त्रधारी बनायला फार परिश्रम वा वेळ लागणार नाही. आर्थिकदृष्ट्या बलवान आणि अण्वस्त्रधारी असलेल्या वा गरज पडल्यास चटकन होऊ शकणाऱ्या अशा या सात राष्ट्रांचा एक विशेष वेगळा गट आहे. याखेरीज ज्यांचे अण्वस्त्रविषयक संशोधन व अण्वस्त्रांची निर्मिती चोरटेपणाने चाललेली असल्याचे माहीत होते अशीही दक्षिण आफ्रिका, इस्राएल*, भारत व पाकिस्तान ही राष्ट्रे होती. (आणखीही चारदोन यात बसणारी असतीलही.) दक्षिण आफ्रिकेने अधिकृतपणे तरी आज अण्वस्त्रांची वाट सोडून दिली आहे.

---

* इस्राएलच्या जवळ अण्वस्त्रांचा चोरटा साठा आहे व तो असल्याचे अमेरिकेला माहीत आहे. पण तिकडे काणाडोळा करण्याचे धोरण आहे.

अनुक्रमणिका

भारत आणि पाकिस्तान ही आता अण्वस्त्रधारी झाली आहेत. पण तेवढ्याने ना भारताला ना पाकिस्तानला महासत्ता हा दर्जा प्राप्त झाला असल्याचे म्हणता येईल. महासत्ता बनावयाचेच असेल तर, अर्थात, अजून वराच लांवचा पल्ला भारताला गाठावयाचा आहे. अण्वस्त्रांचा एक बऱ्यापैकी मोठा साठा, अण्वस्त्रांचा मारा करून संभाव्य 'शत्रू' राष्ट्रांमधील प्रमुख शहरे, औद्योगिक केंद्रे, लष्करी ठाणी इत्यादी नष्ट करण्याची कायमची सिद्धता, आणि या साऱ्यासाठी आवश्यक ते आर्थिक वळ या गोष्टी अजून साध्य करावयाच्या आहेत. महासत्ता वनणे ही दीर्घ काळ घेणारी, मोठी खर्चिक वाव आहे.

महासत्ता वनण्याच्या मार्गावर प्रस्थान आपण ठेवले आहे; ते आता आपले लक्ष्य, व ध्येय म्हणून आपण स्वीकारले आहे, असे म्हणता येईल.

सावरकरवादी तसेच संघ परिवारातील मंडळी यांचे तर अत्याधुनिक शस्त्रास्त्रांनी सज्ज, वलशाली राष्ट्र वनण्याचे स्वप्न आहेच. आपल्या हातात सत्ता आली तेव्हा, सत्ता आल्या आल्या अण्वस्त्र-चाचण्या करून त्यांनी जगाला आपला इरादा स्पष्ट करावा आणि इरादा असा जाहीर करण्याचे श्रेय घ्यावे ही गोष्ट स्वाभाविकच म्हणायला हवी.

भाजप सोडून अन्य कोणत्या प्रमुख पक्षाची मूलतः काही वेगळी भूमिका आहे असे म्हणता येते का?

आजही काँग्रेस हा मोठा पक्ष आहे. या पक्षाच्या हाती स्वातंत्र्यानंतरच्या काळात तीस वर्षे सतत केंद्रात सत्ता होती. पं. नेहरू व लालवहादूर शास्त्री यांच्या काळातही अणुऊर्जेच्या क्षेत्रात भारतात होमी भाभा यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन चालले होते. पण विधायक शांततामय उपयोगांसाठी केवळ या संशोधनाचा उपयोग केला जावा याला वांधिलकी होती. अण्वस्त्रांचे उत्पादन व वापर यात आपण मानवजातीचा घोर अपराध करू अशी तीव्र भावना या दोघांची होती. अणुऊर्जेच्या क्षेत्रातल्या शांततापूर्ण संशोधनाला अण्वस्त्रांसाठीच्या संशोधनाचे वळण कधीही देता येते याची कल्पना या दोघांनाही असणारच. पण अण्वस्त्रांचे उत्पादन करण्याची कल्पनादेखील यांच्या मनात घृणेची भावना उत्पन्न करीत असणार.

श्रीमती इंदिरा गांधी यांच्या कारकीर्दीपासून गुणात्मक फरक पडला. अण्वस्त्रे उत्पादन करण्याची क्षमता संपादन करण्याचा निर्णय त्यांनी शास्त्रज्ञ व लष्करी अधिकारी यांच्या सल्ल्याने घेतला असला पाहिजे.

या विषयाचा विशेष अभ्यास केलेल्या अर्जुन माखिजानी यांचे म्हणणेही येथे ध्यानात घेण्यासारखे आहे. १९६४ साली चीनने अण्वस्त्रचाचणी केली. भारतावरोवरचा सीमावाद मिटलेला नव्हता, व चीनचे १९६२ चे आक्रमण ताजे होते. माखिजानी यांचे म्हणणे असे की, या पार्श्वभूमीवर भारताने अण्वस्त्रनिर्मिती करण्याचा निर्णय केला. वांगला देशाच्या मुक्तीच्या वेळी जे भारत-पाकिस्तान युद्ध झाले त्या वेळी अमेरिकेने अण्वस्त्रांनी सज्ज असा विमानवाहू युद्धनौकांचा समूह वंगालच्या उपसागरात पाठविला. ही सरळ सरळ धमकावणी होती. यानंतरच्या काळात चीन व अमेरिका यांनी परस्परांशी जुळवून घेतले. पाकिस्तानला त्याच्या अण्वस्त्रनिर्मितीच्या कार्यक्रमात चीनची मदत मोठ्या प्रमाणावर मिळू लागली. (याला अमेरिकेची संमती असण्याची शक्यता आहे. भारत अण्वस्त्रनिर्मितीच्या मागे आहे ही गोष्ट अमेरिका, सोविएत रशिया यांना माहीतही असावी.) माखिजानींचे असेही म्हणणे की, एरवीच्या शस्त्रवळ व सैन्यवळामध्ये भारत खूप वरचढ असल्याचे सिद्ध झाले होते. यामुळे 'सत्तेचा समतोल' प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने पाकिस्तान अधिकच नेटाने अण्वस्त्रनिर्मितीच्या मागे लागले. चीन व अमेरिका यांच्या संगनमताने भारताविरुद्ध फळी उभारण्यास केली जाणारी मदत व भारताला एक प्रकारचा वेढा पडणे ही वस्तुस्थितीही भारताने अण्वस्त्रनिर्मिती करण्याचा निर्णय करण्याच्या मागे कारण म्हणून होती. (संदर्भ : 'द साऊथ एशियन न्युक्लिअर क्रायसिस', *फॉरिन पॉलिसी इन फोकस*, जून १९९८.)

भारताचे एका महासत्तेत रूपांतर करण्याचीही इंदिरा गांधींची आकांक्षा होती. जगाच्या रंगमंचावर एक वेगळ्या प्रकारचा ठसा उमटविण्याची त्यांची आकांक्षा होती ही गोष्ट आपण अनुभवली. त्यांच्याच पंतप्रधानकीच्या काळात १९७४ साली पहिल्या प्रथम अण्वस्त्र चाचणी झाली.

इंदिरा गांधींच्या हातातील सत्ता १९७७ मध्ये गेली. १९७७ ते १९९८ या काळात, प्रथम जनता पक्षाचे सरकार सत्तेवर दोनएक वर्षे राहिले, मध्यंतरी पुन्हा एकवार इंदिरा गांधींच्या हाती सत्ता आली, मग काही काळ व्ही. पी. सिंग यांचे सरकार आले. त्यानंतर पुन्हा काँग्रेसच्या हाती सत्ता आली. १९९६ ते १९९८ जनता दलाच्या नेतृत्वाखालील आघाडीच्या हाती सत्ता आली. व आता भाजपच्या नेतृत्वाखालील









आघाडीच्या. या सर्व सरकारांमध्ये, भाजपच्या नेतृत्वाखालचे सरकार वगळता, काँग्रेसमधील मंडळीच शासनात प्रभुत्वपदी होती. अण्वस्त्रनिर्मिती व वापर यांच्या ठामपणे विरोधी भूमिका या काळात असलीच तर लोकशाही समाजवादी मंडळींची असण्याची शक्यता. पण, व्यवहारात, सत्तासमतोलवर चालणाऱ्या आजच्या जगात संरक्षणसिद्धतेसाठी आवश्यक ती शस्त्रास्त्रे बाळगलीच पाहिजेत अशी वास्तववादी राजकारणी भूमिकाच त्यांच्याही बव्हंश नेत्यांची असावी. ते काही असो; मुळात त्यांचा धोरणे व भूमिका यांच्या बाबतीत ठळक प्रभावही १९७७ नंतरच्या काळातल्या शासनांवर राहिलेला नाही. आणि काँग्रेसमधून जनता पक्ष वा पुढे जनता दल यांच्यात आलेल्या मंडळींची भूमिका इंदिरा गांधींच्या भूमिकेपेक्षा वेगळी नव्हतीच.

अर्जुन माखिजानी यांनी त्यांच्या एका अलीकडच्या लेखात म्हटले आहे की, "१९७० व ८० च्या दशकांमध्ये, भारत व पाकिस्तान या दोन्ही देशांची आण्विक क्षमता या टप्प्यापर्यंत येऊन पोचली होती की, अण्वस्त्रांच्या 'खुल्या भागां'चे उत्पादन त्यांनी केलेलेच होते. बॉम्बच्या स्वरूपात त्यांची जुळणी ते हवी तेव्हा करू शकत होते. पण दोन्ही देशांपैकी कोणीच प्रत्यक्षात बॉम्ब बनविले नाहीत आणि बॉम्बर विमाने वा क्षेपणास्त्रे यांच्यावर चढविले नाहीत." माखिजानी म्हणतात, "The nuclear doctrine in South Asia was one of 'non-weaponised' or 'existential' deterrence."** याचा अर्थ असा की, इंदिरा गांधींचे धोरण नंतरच्या सर्व काळात राबविले जात होते. नेहमीप्रमाणेच, मात्र भारतीय जनतेला याची माहिती नव्हती.

पं. नेहरू व लाल बहादूर शास्त्री यांनी बदलत्या परिस्थितीत अण्वस्त्रांच्या निर्मितीची वाट चोखाळली असती की नाही? त्यांच्या काळी हा प्रश्न उपस्थित झाला नाही. पण एवढे आपण म्हणू शकतो की, त्यांना ही वाट चोखाळण्याचा निर्णय घेताना फार क्लेश झाले असते. अशा प्रकारचा तीव्र नैतिक पेच इंदिरा गांधी व नंतरचे नेते यांना पडला असेल असे वाटत नाही.

तात्पर्य, अण्वस्त्रांच्या संदर्भात भाजपच्या नेतृत्वाखाली सरकार आल्यामुळे धोरण बदलले असे काही घडलेले नाही.

भारतातल्या सर्वच प्रमुख राजकीय पक्षांची भूमिका, सत्तासमतोल राखण्याच्या दृष्टीने आवश्यक झाले आहे तर अण्वस्त्रे तयार करण्याची व वापरण्याची क्षमता विकसित करावी हीच राहिली आहे, असे म्हणता येते.

अण्वस्त्र तयार करण्याच्या, ते वापरण्याच्या नुसत्या कल्पनेनेही पं. नेहरू, लालबहादूर शास्त्री, जयप्रकाश नारायण, एस.एम. जोशी यांच्या पिढ्यांच्या संवेदनशील जाणत्या पुढाऱ्यांच्या मनात घृणा उत्पन्न झाली असती. मग नंतरच्या पिढ्यांपर्यंत फरक का पडला?

हा फरक केवळ भारतातच पडला असे नाही. १९४५ साली त्यांचा वापर केल्यानंतर काही काळ 'शीतयुद्ध' बरेच तीव्र होते आणि अण्वस्त्रे वापरली जाण्याचे टळणार नाही अशी अपेक्षा होती. पण एकदा १९४९ साली सोविएत रशियानेही अण्वस्त्रे निर्माण केल्यावर, त्यांची भीषण संहारक क्षमता अनुभवलेली असल्याने, जागतिक पातळीवरील आपल्यातील शीतयुद्धाचा भाग म्हणून जेथे जेथे स्थानिक लढाया होतील तेथेही त्यांचा प्रत्यक्ष वापर करावयाचा नाही हे पथ्य दोन्ही महासत्तांनी सांभाळले. या कारणाने, कधी न वापरले जाणारे, केवळ धमकावण्यासाठी छान उपयोगाचे असलेले, प्रतिबंधक समतोल प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने आदर्श असे अण्वस्त्र हे पोकळ अस्त्र आहे अशी धारणा रुजलेली दिसते. या कारणाने खऱ्या गांभीर्याने १९६० नंतरच्या काळात त्यांच्याकडे पाह्यले गेले नाही. भारतातही, शत्रूला रोखून धरण्यासाठीचे साधन म्हणून उत्पादन, साठवणूक करून ठेवण्याला हरकत नाही, अशी चटकन भूमिका मान्य झाली.

आजची जागतिक राजकीय व्यवस्था परस्परांशी सत्ता, प्रभुत्व, प्रभाव यांवरून स्पर्धा करणाऱ्या राष्ट्र-राज्यांच्या मधील आर्थिक-राजकीय समतोलाच्या तत्त्वावर (बॅलन्स ऑफ पॉवर) आधारलेली व चालणारी उघड उघड विषम व्यवस्था आहे. या व्यवस्थेत भारताचे स्थान १९४७ पर्यंत ब्रिटिश साम्राज्यांतर्गत वसाहतीचे होते. ब्रिटिश साम्राज्याच्या मुकुटातील कोहिनूर असे. १९४७ नंतर भारत हा एक आर्थिकदृष्ट्या मागास, विकसनशील देश ठरला. फाळणी, त्यावेळच्या दंगली यांनी दुबळा झालेला. आर्थिक, राजकीय व लष्करी बळ व सत्ता यांच्या कसोट्यांवर भारत हा तिसऱ्या पायरीवरचा देश राहिला.

असे असूनही जगात भारताच्या शब्दाला अनेक वर्षे मोठे वजन होते. त्याचा अधिकार मान्य होता. या अधिकाराचा

** 'इंडियाज न्युक्लिअर वेपन्स प्रोग्रॅम : ए हिस्टॉरिकल अण्ड स्ट्रॅटेजिक पर्स्पेक्टिव', *बुलेटिन ऑफ ॲटॉमिक सायंटिस्ट्स*, जुलै-ऑगस्ट १९९८.

मूळ स्रोत भारतीय स्वातंत्र्यलढ्याची नैतिकता हा होता. परकीय राजवट उलथून टाकण्यासाठी शस्त्र हातात घेणे, ज्यांचे आपल्यावर राज्य आहे त्यांच्याविषयी मनात शत्रुत्व व द्वेषभाव वागविणे हे यावेळपावेतो सर्वत्र योग्यच मानले गेलेले होते. 'रणाविना स्वातंत्र्य कोणा मिळाले' हीच भावना प्रतिष्ठित होती. गांधींच्या नेतृत्वाखाली भारताने एका आगळ्यावेगळ्या मार्गाचा अवलंब केला. ज्यांच्याबरोबर आपली लढाई आहे त्यांच्याविषयीही मनात प्रेमादर बाळगायला शिकविणारा, समंजस संवादच सतत करणारा हा अहिंसेचा मार्ग होता. फाळणीच्या वेळी झालेले हत्याकांड भीषण होते. अमानुषतेचे ओंगळ व भयचकित करणारे दर्शन घडविणारे होते. पण या सर्व काळातही गांधी व नेहरू – ज्यांनाच जग ओळखत होते – यांचे वर्तन जगाला अलौकिक वाटले. गांधींनी तर नोआखलीमध्ये, व नंतर दिल्लीमध्ये, धीरोदात्त नैतिकतेचा वस्तुपाठच जगासमोर ठेवला. पं. नेहरूंनाही जातीय भावनेचा, द्वेषभावनेचा, सूडवुद्धीचा स्पर्श झाला नाही हे जगाने पाहिले. 'यूनो'च्या रूपाने साकार झालेल्या जागतिक शासनाकडे काश्मीरचा प्रश्न भारताने नेला. शीतयुद्धात अमेरिका व सोविएत रशिया यांच्यापैकी कोणाच्याही गोटात सामील न होता, तटस्थ राहून जगात सामंजस्य, सौहार्द व शांतता प्रस्थापित करण्यासाठी प्रयत्नशील राहण्याची भूमिका वठविली. जगातून युद्धालाच हद्दपार करून चिर शांती प्रस्थापित करण्याचे ध्येय बाळगणारे, सत्तास्पर्धेच्या खेळात उतरण्यास नकार देणारे भारत हे राष्ट्र जगाच्या आदरास पात्र ठरले. एक नैतिक शक्ती म्हणून.

जगात भारताची नैतिक शक्ती म्हणून असलेली प्रतिमा पं. नेहरूंच्या अखेरच्या वर्षांमध्ये डागाळत गेली. याची अनेक कारणे आहेत. त्यांची मीमांसा करण्याचे हे स्थळ नाही. पण या संपूर्ण काळात भारताची चीनशी अटळपणे तुलना होत राहिली. भारतात लोकशाहीचा प्रयोग यशस्वी ठरल्याचे जगाला आरंभी कौतुक होते. पण आर्थिक व सामाजिक क्षेत्रांतील दारिद्र्य, निरक्षरता, अनारोग्य, बेरोजगारी या समस्यांची सोडवणूक करण्याच्या बाबतीत भारताचे ठळक अपयश, आत्मविश्वासाचा अभाव, अंतःसामर्थ्याचे तेज मावळलेले, अहिंसेवरील निष्ठा पोकळ असल्याचा वाढत्या प्रमाणावरील प्रत्यय यांमुळे तुलनेने चीनची सरसता जगात ठसत गेली. १९६२ च्या चीन-भारत युद्धातले भारताचे लाजिरवाणे प्रदर्शन यामुळे भारताचे केविलवाणे दुबळेपण उघड झाले. भारताची पार अप्रतिष्ठा झाली.

लालबहादूर शास्त्रींच्या अल्पावधीच्या पंतप्रधानकीच्या काळात १९६५ साली पाकिस्तानबरोबर भारताचे युद्ध झाले. त्यावेळी भारत व पाकिस्तान ही दोन्ही राष्ट्रे जागतिक वर्णव्यवस्थेत 'शूद्र' कोटीत समाविष्ट आहेत याचा विदारक प्रत्यय आला. ताश्कंदला जाऊन आपणांस महासत्तांच्या निर्णयापुढे मान तुकवून युद्धसमाप्तीचा करार करावा लागला. ताश्कंदला शास्त्रीजी हृदयविकाराच्या धक्क्याने मरण पावले. शास्त्रीजींचा मृत्यू या मानहानीच्या अनुभवाने, मानहानीचा ताण सहन न होऊन ओढवला की नाही याचे उत्तर कधीच मिळणार नाही. ते असो.

इंदिरा गांधी पं. नेहरूंच्या हयातीत राजकारणाच्या आतल्या वर्तुळात समाविष्ट होत्या. भारताची घसरण, अप्रतिष्ठा त्यांनी अनुभवलीच असणार. त्या पंतप्रधान झाल्या तेव्हा देशांतर्गत व आंतरराष्ट्रीय स्तरावर सत्तेचे राजकारण करून स्वतःसाठी व देशासाठी आजच्या व्यवस्थेत प्रतिष्ठेचे स्थान प्राप्त करून घ्यायचे असा निर्धार त्यांनी केला असावा अशी पावले त्यांच्या कारकीर्दीच्या पहिल्या सहा-सात वर्षांमध्ये त्यांनी टाकली. अण्वस्त्रचाचण्या या त्याचाच एक भाग होता. १९७१ साली बांगला देशाला स्वातंत्र्य मिळवून देणारे राजकारण व युद्ध त्यांनी यशस्वीपणे शेवटास नेले. भारताचा धाक व प्रतिष्ठा वाढली. इंदिरा गांधींचाही मान देशात व देशाबाहेर वाढला.

जागतिक शांततेच्या निर्मितीसाठी वद्धपरिकर असलेली नैतिक शक्ती म्हणून आपले एक स्थान निर्माण करण्याची आकांक्षा मग उरली नाही. ती क्षमताही आपण मधल्या काळात गमावली होती. आपला आकार, लोकसंख्या, प्राचीनत्व, सलग इतिहास-परंपरा, नैसर्गिक संसाधने, प्रगल्भ अर्थव्यवस्था, शिक्षित मनुष्यवळ, सापेक्षतः प्रगत विज्ञान-तंत्रविज्ञान यांना साजेसे स्थान आपणांस आजच्या जागतिक राजकीय व्यवस्थेच्या चौकटीत प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर आर्थिक-राजकीय ताकद कमावून ती प्रकट करावयास हवी, अशी धारणा रुजली. या बावतीत मग आपल्यासमोर चीनचा आदर्श होता. इंदिरा गांधींनी त्यांच्या वडिलांनी निवडलेल्या मार्गाचा त्याग बुद्ध्या केला असे म्हटले तर वावगे ठरू नये.

१९७५ ते १९९१ या काळात देशात राजकीय अस्थैर्य राहिले. राजीव गांधींची श्रीलंकेतील गुंतवणूक अंगलट आली. त्यात त्यांचा बळीही गेला. पण या सर्व काळात, सवड मिळेल

तेव्हा कोणत्या मार्गाने वाटचाल करावयाची या निर्णयात काही वदल झाला असे म्हणता येत नाही. नरसिंह राव यांच्या पंतप्रधानकीच्या काळात हा धागा पकडून परत वाटचाल सुरू झाली.

भाजपच्या नेतृत्वाखालील आघाडीच्या सरकारची भूमिका या वावतीत इंदिरा गांधींचीच लाईन पुढे चालविणारी आहे. भाजपचा जो वैचारिक-भावनात्मक वारसा आहे तो वलोपासनेचा, शक्तिप्रदर्शनाचा, वळाच्या आधारे प्रभुत्व प्रस्थापित करण्याच्या आकांक्षेचा आहे. वुद्धाच्या अहिंसेने देशाचा घात केला, अहिंसा व शांती यांचा जप करीत राहिल्याने मुस्लिम आक्रमणे यशस्वी झाली हे त्यांचे विश्लेषण आहे. मुसलमानांचा घातक अनुनय करणारा नेता म्हणून गांधींना त्यांनी अव्हेरले; त्यांचा द्वेष रुजविणाऱ्या संघटनेची व विचारप्रणालीची त्यांना पार्श्वभूमी आहे. तेव्हा, इंदिरा गांधींपेक्षाही जास्त उत्साहाने आजच्या जागतिक व्यवस्थेत भारताला महासत्तांच्या गटात प्रवेश मिळावा म्हणून भाजप प्रयत्नशील राहील यात नवल नाही.

या साऱ्या इतिहासाचा मागोवा अशासाठी घेतला की, अण्वस्त्र चाचण्या घेऊन भाजपने भारताच्या क्षमतेचे व शक्तीचे जे प्रकटन केले, आणि त्या द्वारा पाकिस्तान, चीन यांना व जागतिक महासत्तांनाही जो इशारा केला त्या पावलामागची अटळ गतिकी (डायनॅमिक्स) व तर्कसंगती ध्यानात यावी. भाजपच्या नेतृत्वाखालील शासनाने जे केले ते एक दिवस इतरांनाही करावयाचेच होते.

राष्ट्रातील साऱ्याच प्रस्थापित राष्ट्रीय व प्रादेशिक राजकीय पक्षांच्या कार्यक्रमपत्रिकेवरही ही गोष्ट होतीच, कळत वा नकळत. अगदी डाव्या साम्यवादी पक्षाच्याही. अमेरिका व अन्य पश्चिमी राष्ट्रे यांच्यापासून जागतिक राजकारणाच्या क्षेत्रात आपण स्वतंत्र आहोत, त्यांच्या दावाखाली नाही, हे दाखवून देण्याची जागा त्यांच्याही दृष्टीने हीच राहिली असती. चीनचे उदाहरण आपल्या डोळ्यासमोर आहेच.

– २ –

अण्वस्त्रांची निर्मिती करण्याची गोष्ट भारताने करावी की नाही? अण्वस्त्र चाचण्या करणे योग्य झाले की नाही? या प्रश्नांचे उत्तर आणखी एका पातळीवर द्यावे लागते. महासत्तांच्या गटात आपणांस प्रवेश मिळावयाचा असेल तर यावावतीतली आपली क्षमता सिद्ध करावयास हवीच होती; अण्वस्त्रे व त्यांचा मारा करण्याची व्यवस्था यांचे उत्पादन व उभारणी करून मगच 'वंदी'ची गोष्ट करावयाची तयारी दाखविणेच योग्य आहे, हे उत्तर बरोबर आहे का? ज्या संभाव्य शत्रू राष्ट्रांपासून आक्रमणाचा धोका आहे, ज्यांच्याशी युद्धाचा प्रसंग उद्‌भवण्याची शक्यता आहे त्यांच्यापासून संरक्षण करता येण्यासाठी, आणि पुढे जाऊन त्यांनी युद्ध करण्याचा विचारही करू नये यासाठी, अण्वस्त्रे बाळगण्याची नितांत गरज आहे असे म्हणता येते का?

भारत हे राष्ट्र-राज्यांवर उभारलेल्या जगातले एक राष्ट्र-राज्य आहे. आपल्या शेजारपाजारच्या (व काही लांववरच्याही) राष्ट्रांशी त्याचे संवंध सलोख्याचे नाहीत; यांपैकी काहीशी तर कमीअधिक तीव्र शत्रुत्वाचे संवंध आहेत. स्वतःच्या विस्तारवादी आकांक्षा नसल्या तरी, या शत्रू राष्ट्रांच्याकडून होऊ शकणाऱ्या आक्रमणापासून देशाचे संरक्षण करण्यासाठी मदार शस्त्रसज्ज सैन्यावरच आहे. ही आजची गृहीत व स्वीकृत वस्तुस्थिती आहे. या चौकटीत, देशाच्या संरक्षणाची जवाबदारी अण्वस्त्रांशिवाय पार पडू शकत नाही का, या प्रश्नाचे उत्तर आपणांस द्यावयाचे आहे.

इथे आरंभालाच आपल्याला एका चमत्कारिक गोष्टीला सामोरे जावे लागते. इतर सर्व शस्त्रास्त्रांची निर्मिती ही गरज पडेल तेव्हा हमखास वापरण्यासाठीच असते. अण्वस्त्रे ही मात्र अशी अस्त्रे आहेत की, आम्ही त्यांचे उत्पादन करणार आहोत, पळभरात त्यांचा मारा करता यावा अशी सिद्धता दिवसरात्र अखंड कायम राखणार आहोत; पण खरे तर ती वापरण्यासाठी नाहीत, ती केवळ धमकावून प्रतिपक्षाला रोखण्यासाठी (टु डेटर) आहेत, असे आग्रहपूर्वक म्हटले जाते. जगात प्रथमच असे अस्त्र माणसाने बनवले की, ज्याचा वापर करावा लागू नये, कोणातरी व्यक्तीच्या लहरीपोटी चुकूनपण वापर होऊ नये, याची कमालीची दक्षता अण्वस्त्रधारी दोन महासत्तांनी – अमेरिका व सोविएत रशिया – जवळपास ४० वर्षे घेतली. आणि आजही प्रमुख अण्वस्त्रधारी राष्ट्रांचे या मुद्यावर एकमत आहे. त्याच वेळी, जी जी म्हणून अण्वस्त्रांचे साठे बाळगणारी राष्ट्रे आहेत त्यांपैकी प्रत्येक राष्ट्र आग्रहपूर्वक कोणत्याही क्षणी, निमिषार्धात, अण्वस्त्रांचा मारा करण्याची तयारी मात्र कायम राखण्याची दक्षता तेवढीच घेते.

आपल्याला चकवून, बेसावध क्षणी शत्रूने प्रथम त्यांचा वापर करू नये म्हणून मी माझी तयारी एवढी ठेवावयाची

की, त्याने ती वापरण्याची चूक समजा केलीच तर, त्याचे सर्व राष्ट्र, त्याचे जगभरचे तळ, त्याच्याशी दोस्ती केलेली इतरही राष्ट्रे बेचिराख केल्याशिवाय मी राहणार नाही, तेवढी माझी क्षमता आहे ही त्याची खात्री वर्षानुवर्षे चोवीस तासांतला प्रत्येक क्षण टिकली पाहिजे. अर्थातच, त्या शत्रूनेही वरोबर असेच केले पाहिजे, म्हणजे मग माझ्याही हातून ती चूक होणार नाही. दोघांपैकी एकासही जरी, स्वतः बेचिराख होण्याचा धोका टाळून दुसऱ्याला बेचिराख करण्याइतकी स्वतःची तयारी वरचढ आहे असे काही काळ वाटले तरी, ज्याला तसे वाटेल तो अण्वस्त्रांचा वापर करून जगज्जेता वनण्याच्या मोहात पडेल असे येथे पायाभूत गृहीततत्त्व (ॲक्शम) आहे.

भारत आणि पाकिस्तान यांच्यापैकी अण्वस्त्रनिर्मितीच्या दृष्टीने आधी कोणी आरंभ केला ते खात्रीने सांगण्याइतकी माहिती आम्हांला नाही. पण, एकदा का एकाच्या मनात ही प्रक्रिया दुसऱ्याने सुरू केली आहे असे ठसल्यावर, ते ठसणे वास्तव असो वा नसो, त्या एकाला, आता आपल्यापुढे स्वतःही अण्वस्त्रनिर्मितीची प्रक्रिया सुरू करण्याशिवाय पर्याय नाही, असे वाटते; नव्हे पटते. शत्रूविषयी अविश्वास व संशय तर असतोच. आता एक सर्वंकष भय उत्पन्न होते. कारण अणुबाँब जेथे पडतील ते सर्व बेचिराख होणार याची खात्री हिरोशिमा व नागासाकी या शहरांच्या अनुभवाने सर्वांना आहे.

पाकिस्तान जर अण्वस्त्रनिर्मिती करीत आहे, पण आम्ही मात्र त्या वाटेला जावयाचे नाही असे ठरविले, तर काय होईल? (१) आम्ही अण्वस्त्रविहीन आहोत हे माहीत असल्याने पाकिस्तान (वा चीन वा अन्य कोणते राष्ट्र) आम्हांला धमकावून, त्यांना हवा तो प्रदेश बळकावू शकेल. तावडतोबीने काश्मीर, मग कदाचित आसाम वगैरे. किंवा आणखी अशाच इतरही मागण्या करू शकेल. आणि आमची प्रमुख शहरे, औद्योगिक केंद्रे, लष्करी तळ नष्ट व्हावयाचे नसतील तर आम्हांला दर वेळी शरणागती पत्करावी लागेल. (२) आमच्याही जवळ जर अण्वस्त्रे असती तर आम्हीपण त्यांचे अपरिमित नुकसान करून सूड उगवू शकलो असतो. पण अण्वस्त्रांच्या अभावी ते शक्य होणार नाही. (३) अण्वस्त्रे तयार केली नाहीत, आणि तरीही अण्वस्त्रांच्या माऱ्यापासून संरक्षण हवे असेल तर आम्हांला अण्वस्त्र बाळगणाऱ्या एक ना एका महासत्तेचा आश्रय घ्यावा लागेल. म्हणजे आमचे स्वातंत्र्य व सार्वभौमत्व यांचा संकोच आम्हांला मान्य करावा लागेल.

गरज पडली तर आम्ही भारताची मुख्य पाच शहरे बेचिराख करू शकतो अशी घोषणा पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी केल्याचे वृत्त वाचल्यावर, तरीही भारताने अण्वस्त्रांनी सज्ज होऊ नये असे आपण म्हणणार असलो तर ते योग्य होईल?

चीनच्या संदर्भात हा प्रश्न जर उपस्थित झाला असता तर, पण चीनचा खरोखरच असा हेतू आहे का, असे एकवेळ अनेकांनी विचारले असते. कारण १९६२ साली, भारताचा सहजी पराभव केल्यावरही चीनने नवा प्रदेश ताव्यात न घेता वा अपमानकारक अन्य शर्ती न लादता सैन्य परत घेतले. पण आजच्या घडीला पाकिस्तानविषयी बह्वंश सुशिक्षित भारतीयांच्या मनात इतके कडवट व कट्टर शत्रुत्व आहे की, भारताने जर अण्वस्त्रांची सिद्धता केली नाही तर पाकिस्तान नक्कीच अण्वस्त्रांचा वापर करील, अशी खात्री त्यांना वाटते.

या कारणाने अण्वस्त्र चाचण्यांनाही भारतीय शिक्षित वर्गाचा सार्वत्रिक पाठिंवा आहे, आणि अण्वस्त्रधारी वनण्याच्या कार्यक्रमालाही. शहरी व ग्रामीण जनसामान्यांनी या प्रश्नाचा विचार केलेला नसेल, पण तशीच वेळ आली तर, भारताने अण्वस्त्रनिर्मितीच्या वाटेला जाऊ नये या वाजूने त्यांचा कौल पडेलच असे मानून चालता येणार नाही. कारण जर अण्वस्त्रांनी भारत सज्ज नसला तर क्षणात बेचिराख व्हावे लागेल; तुम्हांला नष्ट व्हायचे आहे का, अशा प्रकारे विषय समोर मांडल्यास, तर मग भारताने अण्वस्त्रे करावीतच असा त्यांचा कौल पडेल ही शक्यता विचारात घेतली पाहिजे. समता, न्याय, वंधुभाव, शोषणमुक्ती यांच्या पायावर एका आदर्श समाजाची उभारणी करण्याचे ध्येय बाळगलेल्या बहुतेक सर्व चळवळींनी 'जनसामान्या'ची एक प्रतिमा मनात वाळगलेली आढळते. जनसामान्य कसे आहेत, त्यांना काय हवे आहे, त्यांचे विचार काय आहेत, त्यांच्या प्रेरणा कोणत्या आहेत, त्यांचे ध्येय काय आहे या बावतीत काही समजुती या चळवळी ठामपणे बाळगतात. त्या बाळगण्यामधून या चळवळीतील कार्यकर्त्यांना स्फूर्ती व बळ मिळते. पण इतिहासात वारंवार असा अनुभव आला आहे की, वेळप्रसंग आला की या जनसामान्यांचे वर्तन अगदी वेगळे होते. कट्टर आक्रमक राष्ट्रवादाची मोहिनी त्यांच्यावर इतर समाजघटकांपेक्षा जास्त पडते. मूलतत्त्ववादी – धर्मवादी हाकेला ते जास्त त्वेषाने प्रतिसाद देतात. टोकाचा अविवेक, क्रौर्य, उन्माद, सूडबुद्धी, स्वार्थ प्रकट करतात.

अनुक्रमणिका

'दुनिया झुकती है, झुकानेवाला चाहिये' असे आपण म्हणतो त्यात तथ्य आहे. जनसामान्यांच्या ठायी उच्च कोटीचे नैतिक, ध्येयनिष्ठ वर्तन करण्याचीही क्षमता असतेच असते. तिचाही प्रत्यय गांधींच्या नेतृत्वाच्या काळात आपणांस आला. पण दुसऱ्या टोकाचेही वर्तन करण्याची अंगभूत प्रवृत्तीही त्यांच्या ठायी तेवढीच असते. आणि ही प्रवृत्ती, हा कल जागविणे, क्रियाशील करणे हे अधिक सहजी शक्य होते, ही गोष्टही, दुर्दैवाने, आपल्या परिचयाची आहे.

आजचे जागतिक वास्तव, पाकिस्तानचे आपल्याशी होणारे वर्तन आणि त्याला असलेली चीनची मदत व अमेरिकेची पुष्टी लक्षात घेतल्यावर अण्वस्त्रसज्ज बनण्याखेरीज अन्य पर्याय उरलेला नव्हता व नाही, हे गंभीरपणे विचारात घ्यायला हवे असे उत्तर आहे.

आम्ही अण्वस्त्रसज्ज होणार असलो तरी, अन्य अण्वस्त्रसज्ज राष्ट्रांप्रमाणेच, त्यांचा प्रथम वापर न करण्यासाठी आम्ही पण वचनबद्ध आहोत; जागतिक पातळीवर अण्वस्त्रांचे पूर्ण निःशस्त्रीकरण करण्याला आमची प्रतिबद्धता कायमच आहे, ही भूमिका आणि अण्वस्त्रसज्जतेचे धोरण यात विसंगती असलीच तर, मग सर्वच अण्वस्त्रधारी राष्ट्रे दोषी आहेत. समता व न्याय या तत्त्वांना अनुसरून आम्ही पण अण्वस्त्रमुक्त जग निर्माण करण्यात मनःपूर्वक सहकार्य देऊच देऊ. वास्तववादी भूमिकेचा हा एक भाग म्हणून तिच्याकडे बघता येते.

अण्वस्त्रसज्जता ही भारतासारख्या देशाला न परवडणारी चैन आहे; दारिद्र्य, अनारोग्य, निरक्षरता, रोजगाराचा अभाव वगैरे बाबी या प्राथम्याने निर्मूल करावयास हव्यात याविषयी दुमत नाही. पण देशाची संरक्षणसिद्धता हा विषय असा आहे की, तिथे दयामाया नाही. 'शिर सलामत तो पगडी पचास' हा येथे न्याय आहे. राष्ट्र म्हणून अस्तित्व प्रथम टिकविले पाहिजेच. हा युक्तिवादही गंभीरपणे विचारात घ्यायला हवा.

– ३ –

अण्वस्त्रांचे उत्पादन केले आणि आनुषंगिक व्यवस्था उभी केली तर भारताच्या संरक्षणाचा प्रश्न खरोखर सुटतो का? म्हणजे, आपण खरोखर स्वावलंबी व स्वतंत्र होतो का?

अण्वस्त्रांनी कोणत्या प्रकारची समस्या निर्माण केलेली आहे याची दखल आपण खरोखरी घेतली आहे का?

दुसरा प्रश्न आपण आधी चर्चेला घेऊ.

एरवीच्या शस्त्रांपेक्षा अण्वस्त्रांचे वेगळेपण दोनतीन गोष्टींमध्ये आहे. हिरोशिमा व नागासाकी या शहरांवर टाकलेले बाँब हे लुटुपुटीचे वाटावेत इतके नंतरचे बाँब जास्त विध्वंसक आहेत. आता जेव्हा अण्वस्त्रांचा मारा केला जाईल तेव्हा एकाच वेळी तो त्या संपूर्ण राष्ट्रालाच, काही काळासाठी तरी, पुरते निकामी करण्याच्या उद्देशाने केला जाईल हे स्पष्ट आहे. ही क्षमता गृहीत धरूनच विचार करायला लागतो. अण्वस्त्रांमुळे ज्या प्रमाणावर व ज्या प्रकारे प्राणहानी होते ती सर्वंकष युद्धाच्या या युगातही कल्पनेतही भयचकित करणारी एक बाब आहे. हिरोशिमा शहरात बाँबस्फोटानंतर उत्पन्न झालेल्या उष्णतेने व नंतरच्या आगींमध्ये साठ-सत्तर हजार माणसे काही क्षणांत खाक झाली. त्यानंतर इमारतींची पडापड, लागलेल्या आगी इत्यादींमुळे हजारो लोक गाडले गेले, भाजून मेले, जखमी झाले. किरणोत्सर्जनातून होत राहिलेल्या प्रदूषणामुळे ओढवलेली वेगवेगळ्या प्रकारची आजारपणे यांमुळे अनेक वर्षे माणसे मेली, विकलांग झाली. जन्मतःच विकृत, दुबळी मुले जन्माला आली. अण्वस्त्रांचे वेगळेपण यातही आहे की, बेजबाबदार, विकृत, लहरी व्यक्ती व राष्ट्रांचे प्रमुख वा सरकारे यांच्या हाती अण्वस्त्रांचा मारा करण्याची क्षमता येण्याने सर्वसंहाराचे चक्र कधी फिरायला लागेल याचा आज भरवसा राहिला नाही. पूर्वी युद्धाची घोषणा केल्यावर, व युद्ध सुरू झाल्यावरही, गोष्टी टप्प्याटप्प्याने घडत जात. अण्वस्त्रांच्या युगात गोष्टी इतक्या वेगाने घडणार की, वणवा पेटल्यावर तो विझवायला वेळ राहीलच याची खात्री नाही. उलट, सूडबुद्धीने इतर देशांतही वणवा जास्त भडकवला जाईल अशीच शक्यता जास्त. म्हणून, अणुबाँबचे युग अवतरल्यावर, आणि त्याचा अर्थ ध्यानात आल्यावर, अण्वस्त्रधारी महासत्ता सतत एका ओझ्याखाली व ताणाखाली वावरत आल्या आहेत. सर्वनाशाची टांगती तलवार डोक्यावर वागवून जगायला लागत आहे. जगाला सर्वनाशापासून वाचविण्याच्या जबाबदारीचे ओझेही त्यांना डोक्यावर वागवावे लागले आहे. अण्वस्त्रांनी ते स्वतःच भयचकित झालेल्या अवस्थेत कायमचे आहेत.

अन्य शस्त्रास्त्रांच्या आधारे युद्ध खेळले जाते तेव्हा, तुमचे तुम्ही घ्या बघून, अशी भूमिका महासत्ता घेऊ शकतात. व्यवहारात, स्वतःच्या हितसंबंधापोटी स्थानिक युद्धांमध्येही त्या हस्तक्षेप करतात हे आपण सतत अनुभवीत आहोत, ही गोष्ट वेगळी. पण अण्वस्त्रे जर जगातल्या लहानमोठ्या राष्ट्रांच्या

अनुक्रमणिका

हाती आली तर जगावर केवढे संकट ओढवेल? या शक्यतेने अनेक वर्षे या महासत्तांची झोप उडालेली आहे.

आपल्याशिवाय आणखी कोणत्याही राष्ट्राने अण्वस्त्रांचे उत्पादन व वापर करण्याची क्षमता संपादन करू नये अशी भूमिका अमेरिका व सोविएत रशिया यांनी घेतली यामध्ये आपले महासत्ता म्हणून असलेले वर्चस्व टिकवून धरण्याचा हितसंबंध जेवढा होता तेवढाच कोणीही उठून जगाचा सर्वनाश ओढवणारी साखळी प्रक्रिया सुरू करू नये याची खबरदारी घेण्याची गोष्टही प्रथमपासून राहिली आहे. या कारणाने संरक्षणाचे छत्र डोक्यावर धरण्याची हमी महासत्तांनी आपल्या प्रभुत्वाखाली राहण्याचे मान्य करणाऱ्या राष्ट्रांना सतत देऊ केली, तर महासत्ता म्हणून आपलेही स्थान निर्माण करण्याच्या इच्छेने इतर काही राष्ट्रांनी अण्वस्त्रे निर्माण केली. घोषित अण्वस्त्रधारी राष्ट्रांव्यतिरिक्त, आपणही क्षमता बाळगतो हे जाहीर न केलेलीही चारसहा राष्ट्रे आज जगात असली तर आश्चर्य नाही. म्हणजे, कोण्या एका राष्ट्राच्या सत्ताधीशांच्या वा सत्ताधारी गटाच्या आततायीपणामुळे सर्वसंहारक युद्धाची साखळी प्रक्रिया सुरू होण्याचा धोका आज वाढला आहे.

भारतासारखे राष्ट्र नक्कीच असे म्हणू शकते की, मुळात अण्वस्त्राचा प्रयोग करण्याचे पातक अमेरिकेने करावयास नको होते. कारण हिरोशिमावर अणुबाँब टाकण्याआधी जर्मनीचा पराभव झालेला होता आणि जपानचा पराभव होणार हे ठरलेले होते. सोविएत रशियाने अणुबाँब तयार केला. त्यानंतर जेव्हा फ्रान्सने प्रथम कोणाला न जुमानता अण्वस्त्र चाचण्या केल्या तेव्हा अमेरिका व सोविएत रशिया यांनी मिळून कारवाई का केली नाही; आणखी नंतर इंग्लंड व चीनविरुद्ध कडक कारवाई का केली नाही, असा जाबही भारत विचारू शकतो. पण म्हणून, मग आता सर्व राष्ट्रांना अण्वस्त्रांचे उत्पादन करण्याची, अण्वस्त्रसज्ज होऊन इतरांना धमकावण्याची मोकळीक असली पाहिजे, ही भूमिका घेणे विवेक व जबाबदारीची जाणीव असल्याचे लक्षण आहे की यांच्या अभावाचे लक्षण आहे? आधी आम्हांलाही अण्वस्त्रधारी महासत्ता बनू द्या, मग तुमच्या-बरोबर इतरांना वेसण घालण्याच्या कामी आम्ही आहोतच, ही भूमिकादेखील गौरवास्पद आहे काय?

अण्वस्त्रांच्या रूपाने सर्वनाशक युद्ध व जवळपास चिरकालीन प्रदूषण यांची जी टांगती तलवार जगाच्या व स्वतःच्या डोक्यावर स्वतःच्या कर्माने आपण लटकावून घेतली आहे त्याची एक अपराधी जाणीव अमेरिकेने १९४५ पासूनच बाळगलेली आहे. सोविएत रशियातही ही जाणीव एका टप्प्यावर शासनाबाहेर उत्पन्न झाली याचा पुरावा आंद्रे साखारोव यांच्या वक्तव्यांमधून मिळतो. हैड्रोजन बाँबचे संशोधन व निर्मिती करण्यात मोठी कामगिरी पार पाडलेल्या या शास्त्रज्ञाने शासनविरोधी भूमिका घेतली. त्यासाठी छळही सोसला, सजाही भोगली. अलीकडच्या काळातल्या, अण्वस्त्रांच्या चाचण्यांवर पूर्ण बंदी घालण्याचा प्रस्ताव असो वा अण्वस्त्रक्षमता अनेक राष्ट्रांच्या पाशी उत्पन्न होऊ नये यासाठीचा प्रस्ताव असो, अण्वस्त्रांचे 'निःशस्त्रीकरण' करण्यासाठीच्या वाटाघाटी असोत, जग अण्वस्त्रमुक्त करण्यामागची भावना व हेतू हे चांगले व सच्चे आहेत. यामधून अमेरिका व रशिया यांची पावले एका वेगळ्या वाटेवर पडू लागली होती. जग अण्वस्त्रमुक्त असावे हेच जर भारताचे प्रामाणिक उद्दिष्ट असेल तर मग आपला यात सहभाग म्हणून आपण अण्वस्त्र चाचण्यांची तयारी रद्द करून, अण्वस्त्रांचे उत्पादन न करण्याचे ठरवून या उद्दिष्टाच्या पूर्तीत साथ द्यायला नको होती का? जे ओझे आज अमेरिका व रशिया वागवीत आहेत, त्यांना जी जगाची चिंता वाहावी लागत आहे त्याबद्दल प्रौढ जाण बाळगणे व त्यांचा मार्ग सुकर करणे ही गोष्ट आपण करावयास नको होती काय?

सीटीबीटी* वा एनपीटी** या तहनाम्यांवर दबावाखाली सह्या न करण्याची भूमिका कायम ठेवूनही आपण वरील गोष्ट करू शकलो असतो. आणि या तहांच्या संदर्भात ज्या तरतुदी आपणांस न्याय्य वाटतात त्यांच्यासाठी जगाचे लोकमत संघटित करीत राहू शकलो असतो.

अमेरिका व सोविएत रशिया यांच्यात जागतिक वर्चस्वासाठी जे शीतयुद्ध सक्रियपणे वर्षानुवर्षे खेळले गेले त्याच्या ऐन भराच्या काळातल्या चिंता वेगळ्या होत्या. फ्रान्स व इंग्लंड यांनी अण्वस्त्रधारी बनण्यात अमेरिकेचा हितसंबंध होता. चीन व सोविएत रशिया यांच्यात वैमनस्य उत्पन्न झाल्यावर, चीन अण्वस्त्रधारी बनण्यातही नाटो राष्ट्रांचा हितसंबंध होता. परस्परांवर कुरघोडी करण्याच्या या सत्तास्पर्धेच्याच पोटी तसेच स्वतःचे हितसंबंध जपण्यापोटी इस्राएल, पाकिस्तान यांनाही

* कॉंप्रिहेन्सिव टेस्ट बॅन ट्रिटी

** न्यूक्लिअर नॉन प्रॉलिफरेशन ट्रिटी.



अनुक्रमणिका

अमेरिकेने प्रच्छन्न प्रोत्साहन दिले असा अंदाज वांधता येतो. दक्षिण आफ्रिकेच्या (त्या वेळच्या गौरवर्णीय वंशवादी) राज्यसत्तेलाही प्रच्छन्न मदत व प्रोत्साहन असेल. जर्मनी स्वतः या क्षेत्रात उतरू शकत नाही, म्हणून जर्मनीचा दक्षिण आफ्रिकेत यामध्ये सहभाग होता, असे वाचल्याचे आठवते. सोविएत रशियाने भारतास मदत केलेली असण्याची शक्यता आहे. सोविएत रशियाने पश्चिम आशियातही गुप्तपणे कोणाकोणास मदत केली असे उद्या उजेडात आले तर आश्चर्य नाही. इराकजवळ अण्वस्त्रे असण्याचा अमेरिकेला दाट संशय आहेच. म्हणजे, सोविएत रशियाचे विघटन होण्याआधीच्या काळात, अण्वस्त्रधारी राष्ट्रांच्या संख्येत वाढ करण्यात या दोन महासत्तांचा वाटा राहिलेला आहे.

दादागिरीचे हे राजकारण आज संपुष्टात आले आहे असे अजिवात नाही. विघटनानंतरचा रशिया हाही एक महासत्ता म्हणूनच स्वतःकडे पाहतो. चीनही दादागिरीचे राजकारण करीत आला आहे. आपणही अगदीच धुतल्या तांदळासारखे नाही.

तेव्हा, आम्हाला कोणी नीतीचे पाठ देण्याची गरज नाही; आम्हीही आमचे हितसंबंध जपण्या-जोपासण्यासाठी अण्वस्त्रधारी होणार, अशी भूमिका आपण घेऊ शकतो. आणि अमेरिका व अन्य अण्वस्त्रधारी राष्ट्रांची, गुरूची विद्या गुरूला फळली अशी अवस्था करू शकतो.

पण याच प्रकारचा युक्तिवाद इतरही राष्ट्रे वापरू शकतात. उदा., पश्चिम आशियातील तेलाचा अमाप पैसा असलेली राष्ट्रे. इराण, इराक, सौदी अरेबिया आदि. अण्वस्त्रे, क्षेपणास्त्रे यांचे स्वतःचे स्वतःच उत्पादन केले पाहिजे असेही थोडेच आहे? यापुढच्या काळात त्यांचाही चोरटा व्यापार होण्याच्या शक्यता वाढल्या आहेत. आजच हा व्यापार चालू झालेला असू शकतो.

अण्वस्त्रे वा अण्वस्त्रे तयार करण्यासाठीचे रेडीमेड घटक यांचा सरसकट प्रसार जर झाला तर ही अस्त्रे जगभरच्या गुंडांच्या टोळ्या, दहशतवादी गट, लहानमोठी राष्ट्रे यांच्या हाती पडण्याच्या शक्यता वाढतात. *अण्वस्त्रांचा फैलाव होऊ नये याची, त्यांचे उत्पादन, त्यांचे साठे, त्यांच्या चाचण्या, त्यांनी मारा करावयाच्या यंत्रणा या सार्‍यांना कावूत ठेवण्याची गरज खरीच आहे; दादागिरीच्या राजकारणापलीकडची एक मोठी जवाबदारी अग्रेसर महासत्ता या नात्याने आज अमेरिकेच्या खांद्यावर आहे, याचे भान भारताने प्रकट करावयास हवे होते.

भारत व पाकिस्तान या दोन्ही देशांनी, आपल्या प्रकट चाचण्यांद्वारा, व गौरवाने अण्वस्त्रक्षमता मिरविण्याच्या घटनेतून, वागण्यामधून, एका अर्थी, हाच संदेश पोचविला आहे की, दादागिरीनेच आम्ही वठणीवर येऊ, एरवी नाही.

पण काय करणार, एकदा चीनच्या मदतीने (व अमेरिकेने काणाडोळा केल्यामुळे) पाकिस्तानने अण्वस्त्रांच्या उत्पादनाच्या दिशेने पावले टाकल्यावर, आम्हांला पर्यायच उरला नाही, असा युक्तिवाद राज्यकर्ते करीत आहेत. पाकिस्तानही हाच युक्तिवाद करीत आहे.

भारताच्या राज्यकर्त्यांचा युक्तिवाद आपण तूर्तास स्वीकारला असे समजूया. अण्वस्त्रधारी बनल्याने आपली संरक्षणाची व्यवस्था खरोखरीच मजवूत झाली आहे का? या प्रश्नाचा विचार करण्याकडे वळूया.

– ४ –

चीनने अण्वस्त्राची चाचणी १९६४ साली केल्याचे उघड झाल्यावर, अण्वस्त्रांची निर्मिती करण्याची क्षमता आपणही संपादित केली पाहिजे असा भारताने निर्णय केला असे माखिजानी यांनी म्हटले आहे. ही गोष्ट खरी असावी. भारताने ही तयारी चालविली आहे याचा सुगावा लागल्यावर पाकिस्ताननेही त्या

* अर्जुन माखिजानी त्यांच्या 'द साउथ एशियन न्युक्लिअर क्रायसिस' या लेखात म्हणतात, 'Moreover, there are also numerous global dimensions to the South Asian nuclear crisis. The tests have rekindled a nascent nuclear crisis in the Middle East, coming as they did at a time when the failing Middle East peace process is spreading gloom and restlessness throughout the region. At the same time they have aggravated the already grave dangers associated with the potential diversion of nuclear materials from Russia and other parts of the former Soviet Union into international black markets... there is a possibility that, given its very weak financial position and the debilitating impact of US sanctions, Pakistani leaders may decide that sharing it nuclear-weapons technology and expertise with countries that provide it with aid may be necessary for the survival of the Pakistani state.

दिशेने पावले टाकली. यामध्ये चीनने पाकिस्तानला मदत केली. एका अर्थी, शस्त्रास्त्रस्पर्धेच्या खोड्यात राष्ट्रे अशीच सापडत असतात. अगदी अमेरिकेचीही गोष्ट घ्या. हिटलरच्या जर्मनीत अण्वस्त्रनिर्मितीचा खटाटोप जारीने सुरू आहे हे कळल्यावर अमेरिकेनेही (म्हणजेच दोस्त राष्ट्रांनी) अण्वस्त्र-निर्मिती करण्यास अग्रक्रम द्यावा असा आग्रह धरला गेला. असा आग्रह धरणाऱ्यांमध्ये जर्मनीतून हुसकले गेलेले, पळून आलेले अनेक शास्त्रज्ञ होते. आइन्स्टाइन यांनीही अमेरिकेच्या अध्यक्षांना पत्र लिहून तातडीने हे काम हाती घ्यायची विनंती केली. तात्पर्य असे की, आजची सर्वच अण्वस्त्रधारी राष्ट्रे, दुसऱ्या कोणत्या तरी राष्ट्राकडे बोट दाखवून स्वतःचे समर्थन करू शकतात. (याला अपवाद फ्रान्स व इंग्लंड यांचा, व पूर्वीच्या वंशवादी दक्षिण आफ्रिकेचा करायला हवा:) तेव्हा, आधी कोणाचा अपराध, हा मुद्दा, तो वैध जरी असला तरी, सध्या बाजूला ठेवू.

पाकिस्तान व भारत दोघेही आजच्या घडीला अण्वस्त्रधारी राष्ट्रे आहेत इथून आरंभ करू. परस्परांपासून वा अन्य शत्रूपासून पाकिस्तान वा भारत अधिक सुरक्षित देश बनला आहे असे म्हणता येते का?

आणि मग आपल्या लक्षात येते की, अण्वस्त्र हे असे अस्त्र आहे की जे फक्त आपल्याजवळ आहे व आपल्या कोणत्याच प्रतिपक्षाजवळ नाही अशी स्थिती असते तेव्हाच अण्वस्त्रे बाळगण्यामधून आपली सुरक्षितता वाढू शकते. आपली दहशत इतरांना आपण घालू शकतो. अशी स्थिती अमेरिकेची १९४५ ते १९४९ या काळात होती. १९४९ साली सोविएत रशिया अण्वस्त्रधारी बनला. (अमेरिकेची मक्तेदारी मोडावी म्हणून अमेरिका व इतर नाटो राष्ट्रे यांच्यातल्या काहींनीच तांत्रिक कागदपत्रे रशियाला पोचविली; एक नैतिक कर्तव्य म्हणून.) आणि जरी अमेरिकेजवळ अण्वस्त्रांचा त्यावेळी जास्त साठा होता व त्याची आघाडी होती तरीही नंतर अमेरिकेला कधीच सुरक्षित वाटलेले नाही. म्हणजे, आज भारत व पाकिस्तान ही दोन्ही राष्ट्रे कितीतरी अधिक असुरक्षित बनली आहेत. कारण आता धोका युद्धातल्या पराभवाचा व हानीचा नाही; आता धोका आहे तो मुख्य शहरे, औद्योगिक केंद्रे, दळणवळणाची केंद्रे व व्यवस्था, लोकसंख्या यांच्या विनाशाचा.

भारत व पाकिस्तान या दोन्ही राष्ट्रांनी स्वतःवर काय संकट ओढवून घेतले आहे ते पाहण्यासारखे आहे. सोविएत रशिया व अमेरिका यांच्याजवळ, अण्वस्त्राच्या माऱ्याची तयारी दुसरे राष्ट्र करीत आहे अशी शंका येऊन स्वतःजवळच्या अण्वस्त्रांनिशी तुटून पडण्यासाठी निर्णय घेण्याच्या साखळी प्रक्रियेची सुरुवात केल्यापासून प्रत्यक्ष 'अण्वस्त्रांचा मारा करा' हा हुकूम दिला जाईपर्यंत, आपली शंका निराधार तर नाही याची तपासणी करण्यासाठी अवधी होता पंचवीस एक मिनिटांचा. हा पुरेसा मोठा कालावधी आहे. शंका खोटी निघाल्यास आदेश उलटविण्यासाठी सवड होती. कारण दोन देशांमध्ये अंतर मोठे होते. या साखळीत अनेक दुवे असल्याने कोणाची तरी लहर फिरली आणि मारा सुरू झाला ही शक्यता जवळपास नव्हती. आणि, समजा, एकाददुसऱ्या माथेफिरू व्यक्तीने वा गटाने परस्पर काही कृती केल्याचे लक्षात आलेच तर, शत्रूला त्याची माहिती देऊन, त्याबद्दल माफी मागून, हा अधिकृत मारा नाही, हे कळविण्यासाठीही दळणवळण व्यवस्था ('हॉट लाइन') होती व वेळेची सवडही.* आणि अशा माथेफिरू व्यक्ती वा गटाकडून काही होत नाही ना, यावर डोळ्यात तेल घालून लक्ष ठेवण्याची, अशा कृतीला मुळातच खुडून टाकण्याचीही यंत्रणा या दोन्ही महासत्तांनी विकसित केलेली होती. ही सारी व्यवस्था एकशेएक टक्के चोख, दक्ष व जागृत राखण्याचे महत्त्व दोन्ही महासत्तांनी जाणले होते. म्हणजे, विनाशाचा धोका केवढा मोठा व खरा असतो, त्यामुळे किती

* "The US and Soviet Union addressed their fears by building enormously complex early warning systems that would let them know they were about to be attacked and give them time to launch their nuclear weapons before they were destroyed. The early warning systems of the superpowers had another crucial role. Since any war would have meant nuclear war, both sides wanted to make sure that war did not begin by accident. Early warning systems created time during which people could make decisions using real information about what was actually happening rather than responding simply on the basis of fears of what might be about to happen." (Zia Mian and A.H. Nayyar, 'Why a Missile Warning System won't help in South Asia,' द न्यूज इंटरनॅशनल या पाकिस्तानी वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेल्या लेखामधून.)

अधिक असुरक्षितता उत्पन्न होते, आणि ती टाळण्यासाठी सारखी तपासणी-पुनर्तपासणी करणारी, नियमन करणारी, सल्लामसलत करणारी किती गुंतागुंतीची यंत्रणा कशी कायम तयार ठेवावी लागते, याची जाण त्यांनी वाळगलेली आहे. म्हणूनच चुकीचे संदेश 'घेतले' जाण्याचे, साखळी प्रक्रियाही सुरू केल्याचे अनेकानेक प्रसंग घडूनही प्रत्यक्ष त्यांचा वापर झालेला नाही.

झिया मियाँ व ए.एच. जय्यर या लेखकद्वयाने त्यांच्या तळटीपेत उल्लेख केलेल्या लेखात म्हटले आहे की, १९७७ ते १९८४ या काळात २०,००० वेळा फसवे इशारे दिले गेले. यापैकी १००० इतके गंभीर मानले गेले की बाँबर विमाने व क्षेपणास्त्रे यांना कोणत्याही क्षणी मारा करण्यास सज्ज राहा असे आदेश दिले गेले. अशा चुका वेगवेगळ्या संगणकीय यंत्रणेतील दोषांमुळे वा मानवी स्खलनशीलतेमुळे वा कोणाची 'चूक' नसताही घडू शकतात. रडार यंत्रणेवर काही दिसते, पण तो हल्ला नाही हे कळायला काही अवधी व इतर तपासण्या लागतात.

भारत व पाकिस्तान हे देश एकमेकांना खेटून आहेत. त्यामुळे, मारा येऊन पोचण्याच्या आधी वेळीच इशारा देण्याची यंत्रणा जरी समजा चोख काम करीत असली तरी, चूक झालीय, हा चकवा देणारा इशारा आहे, हे शोधून सापडायला अवधी नसणार आहे. पृथ्वी क्षेपणास्त्राला पाकिस्तानमधील कोणत्याही ठिकाणापर्यंत पोचायला तीन ते पाच मिनिटे जास्तीत जास्त लागतील. हीच गोष्ट घोरी क्षेपणास्त्राची. म्हणजे अमेरिका व रशिया यांच्या दरम्यान इशारा देणारी यंत्रणा व व्यवस्था, इशारा देण्याच्या जोडीला, वेळीच हात धरून संहार टाळण्याचे जे कार्य करीत आली ते पार पाडायला येथे अवधीच नाही. म्हणजे दोन्ही राष्ट्रे असुरक्षिततेच्या खाईत सापडलेली, डोक्यावर महाप्रचंड विध्वंस व संहार यांची टांगती तलवार कायमची आणि आपल्या भवितव्याच्या शेंड्या अनेकांच्या हाती, अशी आपली अवस्था यापुढे होऊ शकेल – आपण जर आत्ताच शहाणपणाने पाऊल मागे घेतले नाही तर.

भारतातील राज्यकर्त्या व विरोधी राजकीय पक्षांतील नेत्यांची व्यक्तित्वे व चरित्र/चारित्र्य, त्यांची समज, त्यांची सत्यनिष्ठा, त्यांचा वकूब यांचा मुद्दा आपण येथे उपस्थित करीत नाही. प्रशासनयंत्रणेतील सर्व पातळ्यांवरील गलथानपणा, कामचुकारपणा, बेशिस्त, भ्रष्टाचार, विभिन्न खातीयंत्रणांमधील संयोजनाचा अभाव इत्यादी मुद्देही आपण विचारात घेत नाही. राजकारणी व प्रशासक यांची राजकीय मते, त्यांची शासनबाह्य संघटनांना असलेली बांधिलकी, त्यांचा पक्षपातीपणा, त्यांचा खोटारडेपणा व निर्लज्ज स्पष्टीकरणे यांचाही आपण विचार करीत नाही. या सगळ्या गोष्टी महत्त्वाच्या आहेतच.

भारत व पाकिस्तान यांची मोठी सरहद्द समाईक आहे, व भौगोलिकदृष्ट्या आपण एकाच उपखंडातले आहोत. त्यामुळे किरणोत्सर्जनातून होणारे प्रदूषण उभय राष्ट्रांना भोवेल हे वर ध्यानात घेतले पाहिजेच.

किंवहुना, आपण असे सर्वसाधारण विधान करू शकू की, आजच्या अतिसंहारक शस्त्रास्त्रांच्या युगात, वैज्ञानिक-तंत्रवैज्ञानिक साधनांद्वारे खेळल्या जाणाऱ्या सर्वंकष युद्धाच्या जमान्यात जेवढे तुमचे राष्ट्र अत्याधुनिक शस्त्रास्त्रांनी सज्ज असेल तेवढी असुरक्षितता जास्त, तेवढे भय जास्त, तेवढी विनाशाची टांगती तलवार सतत डोक्यावर. कारण ती शस्त्रास्त्रसज्जताच तुमची युद्धखोर प्रतिमा प्रक्षेपित करते, लष्करशाहीचा वा लष्कराच्या प्रभुत्वाचा धोका वाढतो, विस्तारवादी-आक्रमक भूमिका घेण्याचा मोह वाढतो आणि मग तुम्हांला वठणीवर आणायला हवे, दाबात ठेवायला हवे असे वाटणारा पक्षही तयार होतो. कारण 'सत्तेचा समतोल' प्रस्थापित करायचा असतो. 'समतोल' म्हणजे सतत कुरघोडीचा पण अयशस्वी प्रयत्न. कधीकधी काही काळ असमतोल प्रस्थापित होतो. भारत-पाकिस्तान यांच्यामध्ये असा असमतोल प्रस्थापित झाला १९६५ साली, पुन्हा १९७१ साली. तेव्हा पाकिस्तान अण्वस्त्रांच्या वाटेकडे वळले असा एक युक्तिवाद आहेच. थोडक्यात, अण्वस्त्रे ही अशी अस्त्रे आहेत की ज्यांमुळे, जर तुमचे तीव्र शत्रुत्व काही राष्ट्रांशी असले तर, देशाच्या संरक्षणाची हमी जवळपास पूर्णच नष्ट होते.

अण्वस्त्रांचे एक आणखी वैशिष्ट्य ध्यानात घेण्यासारखे आहे. त्याचा संपूर्णपणे एकतर्फी वापर जगाला मंजूर नाही. म्हणजे तसा हल्ला कोणी कधीच करणार नाही असे नाही. पण ते राष्ट्र अधम गणले जाईल. असे नसते तर अमेरिकेने दोन युद्धांच्या वेळी तरी अण्वस्त्रांचा वापर केला असता. एक, उत्तर व्हिएतनामशी चाललेल्या प्रचंड खर्चिक व मानहानी ओढवून घेणाऱ्या युद्धाच्या वेळी. दुसरे उदाहरण, इराकशी झालेल्या परवाच्या लढाईत.

'पाकिस्तान हे तसे अधमपणाने वागणारेच राष्ट्र आहे. हे मूलतत्त्ववादी मुस्लिम राष्ट्र आहे. बघा काश्मीरमध्ये किती घूसखोरी व हत्याकांड चालविले आहे,' असे कोणी कोणी म्हणेल. तर त्याचाही विचार करू. जर ते तसे असेल तर, प्रतिबंधक (डेटरन्स) म्हणून आपल्याजवळील अण्वस्त्रांचा फारसा उपयोग नाही; कारण प्रथम मारा करण्यासाठीच ते कायम टपलेले राहणार, हेही ओघानेच येते. आणि अण्वस्त्रे असूनही जे काही संरक्षणाचे आश्वासन ती बाळगण्यापासून मिळते ते तेव्हाच मिळते जेव्हा 'आम्ही प्रथम मारा करणार नाही' हे आश्वासन प्रतिपक्ष देतो व ते तो पाळील हे आपण गृहीत धरून वागतो. म्हणजे, प्रतिपक्ष तेवढा, शत्रू असूनही, जबाबदार आहे हे गृहीततत्त्व (ॲक्शम) असते. आणि अण्वस्त्रांचे भीषण परिणाम ध्यानात घेऊन जे राष्ट्र एवढे जबाबदार बनते ते राष्ट्र अण्वस्त्रांच्या बाबतीत 'निःशस्त्र' असणाऱ्या प्रतिपक्षावर त्याचा प्रयोग करायला सहजी तयार होणार नाही.

आणि एखाद्या राष्ट्राने तसे केलेच तर, इतर राष्ट्रे त्याला अपराधी धरून वागवितील.

भारताने आपली अण्वस्त्रे निकामी केली, त्यासाठी जी जी तयारी चालविली होती ती सोडून दिली आणि याची हवी त्याने खात्री करून घ्यावी असे आमंत्रण दिले तर काय होईल? भारताने असे केले तर आपणही 'निःशस्त्रीकरण' करू असे आश्वासन पाकिस्तानने दिले आहे. ते पाळण्याचा पाकिस्तानवर प्रचंड आंतरराष्ट्रीय दबाव येईल. पाकिस्तानने नाही ऐकले तर? तर इराकला जसे कोंडीत पकडले आहे तसे पाकिस्तानला पकडले जाईल.

खरी गोष्ट अशी आहे की, एकदा तुमच्यापाशी अण्वस्त्रे आहेत किंवा तुम्ही त्यांच्या निर्मितीसाठी प्रयत्नशील आहात याचा सुगावा लागला की, तुमची इच्छा असो वा नसो, एका आंतरराष्ट्रीय नियमन-नियंत्रण-देखरेख-निर्बंध-दंड (सँक्शन्स) या चौकटीत तुम्ही खेचून घेतले जाताच. आणि ही गोष्ट योग्यच आहे. पाचपन्नास अणुबाँब गाठीशी असण्याने संरक्षणाची हमी निर्माण होत नाही. संरक्षणाची हमी महासत्तांनी उभ्या केलेल्या व्यवस्थेच्या आधारेच मिळते, हे वास्तव आहे. अण्वस्त्रधारक आहोत हे चाचण्या करून भारत व पाकिस्तान यांनी घोषित करायच्याही आधी, आपण त्या व्यवस्थेत ओढले गेले होतो. या व्यवस्थेच्या दावणीला बांधलेले आहो की, जी विषम आहे, अंशतः जी बळजबरीवर आधारलेली आहे, आणि जी आपण नाकारली तर स्वतःच्या बळावर आपण आपले संरक्षण करू शकणार नाही.

सत्तेच्या व्यावहारिक राजकारणाच्या ('रिअल पॉलिटिक') वास्तववादी चौकटीतही, थोडा थंड डोक्याने विचार केला असता तर, अण्वस्त्रधारी बनून देशाचे संरक्षण पक्के करण्याची कल्पना ही अडाणीपणाची खूण आहे; हा सारा खटाटोप व्यर्थ जाणार, हे पूर्वीही लक्षात येऊ शकले असते, ध्यानात आले असते.

अमेरिका, रशिया, चीन, फ्रान्स, इंग्लंड ही अण्वस्त्रधारी राष्ट्रे अण्वस्त्रे बाळगून आहेत म्हणून सुरक्षित नाहीत. त्यांचे क्रियाशील स्वरूपात आज कोणाशी शत्रुत्व नाही म्हणून ती आज बव्हंशी सुरक्षित व भयमुक्त आहेत. पण ज्यावेळी तीव्र शीतयुद्ध चालू होते तेव्हा राष्ट्रांना अण्वस्त्रे असूनही भयग्रस्त व असुरक्षित वाटत होते.

मग असा निष्कर्ष हाती येतो की, राष्ट्राचा जास्तीत जास्त सर्वंकष व सर्वदूर नाश ओढवून घ्यावयाची हमखास उपाययोजना शत्रूसोबत अण्वस्त्र स्पर्धेच्या चक्रात स्वतःला अडकवून घेणे ही होय. कायमचे असुरक्षित व भयभीत व्हायचे असेल तर याहून अधिक परिणामकारक उपाययोजना दुसरी नाही.

– ५ –

जागतिक राजकारणात व राजकीय व्यवस्थेत भारताला एक योग्य स्थान व प्रतिष्ठा मिळावयास हवी, त्याचा एक प्रभाव पडायला हवा, ही आकांक्षाच गैर म्हणता यावयाची नाही. ते स्थान आज त्याला दिले जात नाही, ही वस्तुस्थिती आहे.

या संदर्भात दोन, वा तीन, प्रश्न विचारात घेण्याची आवश्यकता आहे. (१) जागतिक व्यवस्थेची आपली कल्पना काय आहे व काय असायला हवी? (२) स्थान, प्रतिष्ठा, प्रभाव यांचे अर्थ आपले कोणते आहेत व असावेत? आणि (३) या गोष्टी प्राप्त करून घेण्याचा योग्य मार्ग कोणता?

पंधराव्या शतकानंतरच्या काळात, आधुनिक युगात साम्राज्यसत्तांनी जगाला एकत्र आणले व एका जागतिक राजकीय-आर्थिक व्यवस्थेत बांधले. पृथ्वीचा प्रत्येक कानाकोपरा धुंडाळून त्यावर आपली मालकी वा प्रभुत्व प्रस्थापित करण्याची महत्त्वाकांक्षा साम्राज्यसत्तांनी बाळगली. यासाठी चढाओढ होती. यात त्यांना बऱ्यापैकी यशही मिळाले. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या

काळात साम्राज्ये विलय पावली. विलय पावणारे शेवटचे साम्राज्य म्हणून सोविएत युनियनच्या विघटनाकडे पाहता येईल. औपचारिकतः राजकीय साम्राज्ये विलय पावली असली तरी जागतिक व्यवस्थेची राजकीय-आर्थिक मांडणी मूलतः तशीच विषम राहिली आहे. तिचे वर्णन आपण 'नववसाहतवाद' या शब्दाचा वापर करून करतो.

भारताला याच व्यवस्थेत 'साम्राज्यसत्ते'चे स्थान प्राप्त करून घ्यायचे असेल तर त्याचे मुख्य साधन आर्थिक बळ हे आहे. वैज्ञानिक-तंत्रवैज्ञानिक सामर्थ्य, भांडवली बळ व निर्यात व्यापारात सरसता हे आर्थिक बळाचे प्रमुख घटक असल्याचे दिसते. केंद्रीभूत राज्यसत्ता, राष्ट्रवादी भक्कम संघटन आणि औद्योगिक-व्यापारी-भांडवली शक्तींचे राष्ट्रांतर्गत वर्चस्व हेपण आवश्यक घटक असल्याचे आढळते.

अण्वस्त्रांचे साठे व अण्वस्त्रांनिशी युद्ध करण्याची सज्जता व क्षमता हा घटक पार गौण ठरतो. तो अनावश्यकही म्हणता येईल. सोविएत रशियापाशी हे बळ होते. अमेरिकेच्या खालोखाल. पण ते अखेरीस सोविएत युनियनरूपी साम्राज्य राखायलाही पुरे पडले नाही. उलटपक्षी, जपान व जर्मनी यांच्यापाशी हा घटक नाही. तरीही त्या महासत्ता आहेत.

म्हणजे, जरी व्यावहारिक पातळीवर विचार केला, आणि परंपरागत अर्थाने नववसाहतवादी महासत्ता बनण्याचे लक्ष्य योग्य मानले तरी, अण्वस्त्रधारी बनण्याने आपले उद्दिष्ट साध्य होऊ शकत नाही, हे सूर्यप्रकाशापेक्षाही जास्त स्पष्ट आहे. उलट, आपल्याजवळ जी काही नैसर्गिक, मानवी व आर्थिक संसाधने आहेत त्यांचा वापर पूर्णतया आर्थिकदृष्ट्या शक्तिशाली बनण्यासाठी कामी आणावा ही गरज आहे.

जगात एक चातुर्वर्ण्यव्यवस्था प्रस्थापित आहेच. ती तशीच नेहमी राहणार असा 'वास्तववादी' व व्यावहारिक दृष्टिकोन अंगिकारून वरिष्ठतम वर्णात – म्हणजे नववसाहतवादी महासत्तांच्या गोटात – आपला प्रवेश व्हावा यासाठी आपण प्रयत्नांची शर्थ करावी, की समता, बंधुभाव, सर्वोदय-अंत्योदय या तत्त्वांवर एका वेगळ्या व्यवस्थेच्या रूपामध्ये जगाचे ऐकात्म्य साकार करण्याचे ध्येय बाळगावे?

पारंपरिक परिभाषेत, स्थूलपणे, आपण पहिल्या भूमिकेसाठी 'राजस' आणि दुसऱ्या भूमिकेसाठी 'सात्त्विक' हे शब्द वापरू शकू. भारताची घसरण होत होत आज आपण 'तामसिक' पातळीवर आहोत असे म्हणता येईल. 'सात्त्विक'साठी इंग्रजी प्रतिशब्द 'गुड', 'राइचस' हे वापरणे अधिक योग्य ठरेल. 'जस्टिस' हा शब्द पुरा पडत नाही, आजच्या रूढ अर्थाने. कारण, 'शठं प्रति शाठ्यम्' हे 'जस्टिस' (न्याय्य) मध्ये बसेल.

आजच्या सर्व महासत्तांनी – एकेकाळच्या साम्राज्यसत्तांनी – त्यांचे आर्थिक-राजकीय बळ स्वकीय व परकीय यांच्या शोषणामधून, दडपणुकीतून, विषम वागणुकीतून संपादन केले आहे. आज त्या स्वकीयांचे तीव्र शोषण करीत नाहीत असे दृश्य दिसते. पण परकीयांचे शोषण मात्र वेगवेगळ्या बटवटीत व प्रगल्भ, सरळसरळ वा प्रच्छन्न मार्गांनी त्या आजही करीत आहेत. राजस वास्तववादी-व्यावहारिक भूमिकेचा अंगीकार करून भारताला बलिष्ठ महासत्ता व्हायचे असेल तर, प्रथमतः, अग्रक्रमाने व दीर्घकाळ, स्वकीयांचे शोषण, त्यांची दडपणूक करण्याखेरीज पर्याय नाही. 'ग्लोबलायझेशन'च्या नावे आपण ती प्रक्रिया गतिमान व तीव्र केली आहेच.

भारताच्या स्वातंत्र्यलढ्याचे आरंभापासूनच एक वैशिष्ट्य राहिले. गांधींच्या नेतृत्वाच्या काळात ते अधिक ठळकपणे अधोरेखित झाले. राष्ट्रवाद हीच जरी बैठक असली तरी, भूमिका सात्त्विक होती. प्रस्थापित चातुर्वर्ण्यव्यवस्था, देशातली व देशाबाहेरचीही, मोडण्याचा आमचा संकल्प होता. सत् चा (यात गुड व राइचस या दोन्हींचा समावेश आहे) आधार आमच्या स्वातंत्र्यलढ्याला होता. आम्ही तेव्हाही हिटलर, मुसोलिनी, फ्रँको या हुकूमशहांच्या विरोधात भूमिका घेतल्या. जपानच्या साम्राज्यवादाच्या विरोधात चीनच्या बाजूने उभे राहिलो. आम्ही बहुसंख्य-अल्पसंख्य अशी भारतातल्या धार्मिक समाजांची विभागणी केली नाही. लोकशाही म्हणजे 'बहुमताची ठोकशाही' हा अर्थ केला नाही. जातपात व स्पृश्यास्पृश्यता यांना मोडीत काढायचा आमचा निर्धार होता. आदिवासींना 'रानटी' म्हणून आम्ही गणले नाही. भारतातील लोकशाही समाजवादी विचारप्रणाली ही प्रधानतः नैतिक प्रेरणा व ध्येये जपणारी विचारप्रणाली राहिली आहे. ती अर्थवादी वा सत्तावादी नव्हती. गांधींच्या व्यक्तित्व व विचार यांतील अनेक गोष्टींशी जगातल्या व देशातल्या अनेकांचे मतभेद कायम राहिले; पण गांधी हे भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या अंतिम ध्येयाचे प्रतीक होते.

म्हणूनच स्वातंत्र्य मिळण्याच्या आधीपासून, भारत एक अंकित देश असूनही, मानवजातीच्या भल्यासाठी कार्यरत असलेली नैतिक शक्ती म्हणून भारताला जगात प्रतिष्ठा व मान्यता होती. भारताने स्वातंत्र्यलढ्याच्या ओघात जो मार्ग दाखवून दिला त्याच मार्गाने जाऊन जगात युद्धांची अखेर






होईल व शांतता प्रस्थापित होईल हा विश्वास, ही खात्री त्या पाठीशी होती.

अनेक वर्षे भारताच्या शब्दाला एक वजन होते. भारताविषयी आदरभाव होता. पं. नेहरूंच्या कारकीर्दीच्या उत्तरकाळात भारत अन्य राजस राष्ट्रांप्रमाणेच राजकारणी भूमिका घेऊ लागला असे जसे अनुभवाला आले तसे भारताचे स्थान ढासळत गेले. १९७७ साली आणीबाणी लादणाऱ्या इंदिरा गांधींचा पराभव भारतीय जनतेने केला तेव्हा परत भारताविषयी जगभर आदर वाढला. भारतीय लोकशाहीने प्रकट केलेल्या अंतःसामर्थ्यासाठी वाटणारा तो आदर होता.

पण नंतरच्या काळात भारतीय लोकशाहीचाही झपाट्याने ऱ्हास झाला. लोकशाहीसाठीचेही कौतुक ओसरले. भ्रष्ट, दुबळ्या भारताविषयी एक तुच्छभावच वाढत गेला. या सगळ्यातूनही, गांधींचा देश म्हणून काही आदरभाव शिल्लक राहिला. दक्षिण आफ्रिकेचे नेते नेल्सन मंडेलांना भारतात आवर्जून यावेसे वाटले.

ज्या प्रकारे आपण अण्वस्त्र चाचण्या केल्या, आणि प्रौढी मिरवली त्याद्वारे, हा देश गांधींचा देश नाही, असे राजकर्त्यांनी जगाला घोषित केले. अण्वस्त्रधारी बनल्याने आज तरी आपण ना आपला धाक निर्माण केला आहे ना कोणाचा आदर संपादन केला आहे. उलट, विश्वास टाकायला पात्र न राहिलेला देश, अशीच नवी प्रतिमा आपण निर्माण केली आहे.

आपल्या शेजारी व अवतीभवतीच्या राष्ट्रांचे काय? श्रीलंका, बांगलादेश, नेपाळ, भूतान, भविष्यात स्वतंत्र राष्ट्र बनण्याची शक्यता असलेला तिबेट (ज्याचे राष्ट्रप्रमुख दलाई लामा आपल्या देशात राहतात), अफगाणिस्तान, मध्य आशियातील नवस्वतंत्र राष्ट्रे इत्यादी. यांपैकी काही तटस्थ राहून बघ्याची भूमिका घेतील, मनात प्रश्नचिन्ह बाळगून. अण्वस्त्रधारी भारताविषयी आदर वा मैत्रीभाव वाढेल अशी शक्यता नाही. अगदी शेजारची राष्ट्रे आहेत त्यांच्या मनातला अविश्वास व संशय बळावेल. भारताककडे नेतृत्व व मार्गदर्शन यासाठी ते पाहतील ही शक्यता शून्य.

– ६ –

अण्वस्त्रांना एक मानुष-अमानुषतेचे, पाप-पुण्याचे परिमाण पण आहे. माणसाने कधीही ओलांडू नये अशा एका लक्ष्मणरेषेचे, मर्यादेचे.

पंतप्रधान होण्याआधी, १९९५ साली, अटलबिहारी वाजपेयींनी 'हिरोशिमाकी पीडा' या मथळ्याची रचलेली कविता अलीकडे वाचण्यात आली. त्या कवितेत त्यांनी या परिमाणाचे भान प्रकट केलेले आढळते. या कवितेत वाजपेयी विचारतात की, ज्यांनी अणुबाँबचा स्फोट केला त्यांना हिरोशिमा-नागासाकीतल्या 'भीषण नरसंहारा'ची खबर कळल्यावर त्यांची झोप उडाली नाही का? या कवितेचे अखेरचे कडवे असे आहे :

*किंतु जिनके आविष्कारसे*
*वह अंतिम अस्त्र बना*
*जिसने छह अगस्ट उन्नीसौ पैयतालिस के कालरात्रीको*
*हिरोशिमा-नागासाकी मे मृत्युका तांडव कर*
*दो लाख से अधिक लोगोंकी बलि ले ली,*
*हजारों को जीवनभर के लिए अपाहिज कर दिया,*
*क्या उन्हे एक क्षण के लिये सही,*
*यह अनुभूती हुई कि,*
*उनके हाथों जो हुआ, अच्छा नही हुआ?*
*यदि हुई, तो वक्त उन्हे कठघरेमे खडा नही करेगा,*
*किंतु यदि नही हुई,*
*तो इतिहास उन्हे कभी माफ नही करेगा.*

या ओळी लिहिणाऱ्या वाजपेयींनी स्वतःच्या या वेळच्या पंतप्रधानकीच्या कारकीर्दीची सुरुवातच, अण्वस्त्रचाचण्यांनी व अण्वस्त्रधारी बनल्याचा गर्व व्यक्त करीत व्हावी ही गोष्ट फार बोलकी आहे.

भारताच्या अधःपतनाचे वाजपेयी हे प्रतीकच ठरतात. नैतिक संवेदनाशून्य बनल्याचे हे लक्षण आहे.

स्वातंत्र्याच्या सुवर्णमहोत्सवी वर्षाच्या काळातच भारताने आपली बेइज्जत आपल्याच हातांनी करून घ्यावी याहून अधिक दुःखद गोष्ट कोणती होऊ शकली असती?

इतके करूनही, संरक्षण अधिक साधले असे म्हणावे तर, तिकडूनही भविष्य अधिक असुरक्षित व भयग्रस्त बनावे यालाच आमंत्रण आहे.

तेलही गेले, तूपही गेले, हाती काय उरले?

**वसंत पळशीकर**



अनुक्रमणिका

# कर्मवीर भाऊराव पाटील आणि अस्पृश्यतानिवारण

रत्नाकर बापूराव मंचरकर

ग्रामीण महाराष्ट्राच्या पुनर्घटनेला गती देणे हे कर्मवीरांचे जीवनकार्य होते. त्यासाठी त्यांनी शिक्षणप्रसार हे माध्यम जाणीवपूर्वक वापरले आणि जातिभेदाचे निर्मूलन करून समतेचे व एकात्मतेचे नवे मूल्य रुजविण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे अस्पृश्यतानिवारण हा त्यांच्या एकूण कार्याचा एक अंगभूत भाग राहिला.

तथापि दलितमुक्तीच्या इतिहासकारांनी त्याची तितकीशी दखल घेतल्याचे आढळत नाही. उदाहरणार्थ, *जातिवाद आणि वर्गवाद* (दु.आ. १९७८) या आपल्या ग्रंथात नलिनी पंडित दोनच ठिकाणी कर्मवीरांचा उल्लेख करतात आणि तोही सारख्याच अशा अवघ्या तीन-तीन ओळींमध्ये. त्यामुळे अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यातील कर्मवीरांचे योगदान ठसठशीतपणे लक्षात यावे यासाठी त्याची शोधपूर्वक सलग मांडणी करण्याचा प्रयत्न येथे केला आहे. यापैकी काही तथ्यांकडे नव्याने लक्ष वेधले आहे. तर जुन्या तथ्यांना नवे आधार दिले आहेत. त्यासाठी असंकलित, अप्रकाशित आणि प्रकाशित असूनही उपेक्षित अशा साधनांचा[१] वापर केला आहे. त्यांचा विचार करताना कर्मवीरांच्या व्यापक कार्याचा संदर्भ जागा ठेवला आहे. तसाच रयत शिक्षण संस्थेचाही विचार केला आहे. या गोष्टींचा सुटासुटा विचार करता येऊ नये इतक्या त्या एकमेकांशी जोडलेल्या आहेत.

अभ्यासकांना कर्मवीरांच्या अस्पृश्यतानिवारण कार्याचा सामग्र्याने बोध झाला आणि त्यात काही नावीन्य जाणवले, तर माझ्या परिश्रमांचे सार्थक होईल.

### कर्मवीरांची दलित संवेदनशीलता

कर्मवीरांच्या कार्याला सत्यशोधक समाजाची आणि ब्राह्मणेतर चळवळीची पार्श्वभूमी आहे. जातिव्यवस्थेने माणसामाणसात निर्माण केलेली विषमता आणि समाजातील दुफळी कर्मवीरांच्या अनुभवांची होती. जन्म-जात-व्यवसाय-आर्थिक उत्पन्न-सामाजिक प्रतिष्ठा अशी माणसाला बंदिस्त करणारी साखळी जातीयतेने त्याच्या पायात अडकविली होती. "हिंदू समाजात कोणीही जन्माला आला तरी तो या ना त्या जातीमध्ये जन्माला येतो व त्या त्या जातीची समाजविध्वंसक घाण अंगी वाळगीत वाढत असतो."[२] ही वस्तुस्थिती त्यांना जाणवते. "या देशातील जातिभेद पार नष्ट झाले पाहिजेत, असे माझे ठाम मत आहे आणि मी तशी शपथही घेतली आहे."[३] असे ते सांगतात. या कामासाठी सर्वांनी मनापासून झटले पाहिजे, तरच महाराष्ट्राला चांगले दिवस येतील अशी त्यांची धारणा आहे.

जातिभेदाचा सगळ्यात अमानुष प्रकार म्हणजे अस्पृश्यता. "या देशात हरिजनोद्धार हा विषय अत्यंत किचकट व हाताळण्यास त्रासाचा आहे"[४] याची कर्मवीरांना जाण आहे. माणसामाणसामध्ये भेद करण्यास वस्तुस्थितीत कोणताही आधार नाही, हे सांगताना ते म्हणतात, "ब्रह्मदेवाने बुद्धी ही कोणा एकट्या वर्गास मक्तेदारी म्हणून दिलेली नाही. या वेळेपावेतो शूद्र नि अतिशूद्र वर्गातही अव्वल दर्जाची बुद्धी आहे, हे (मी) गेल्या तीस वर्षांतील अनुभवाने, विश्वासाने व अभिमानाने सांगतो."[५] सगळी माणसे समान आहेत या जाणिवेमुळे अस्पृश्यता हा त्यांना कलंक[६] वाटतो. त्याची जबाबदारी ब्राह्मणी व्यवस्था आणि मनोवृत्ती यावर तर ते टाकतातच पण इतर वरिष्ठ समाजालाही त्यासाठी काही प्रमाणात जबाबदार धरतात. "..... मराठा समाज जर जागृत असता तर अस्पृश्यताही टिकली नसती व शेटजी-भटजी यांचे राज्यही आले नसते."[७] असे आपल्या सामाजिक प्रकृतीचे यथार्थ निदान त्यांनी केले आहे. निरनिराळ्या धर्माच्या लोकांच्या राजवटी आल्या पण "या सर्व राजवटींतून बहुजनसमाजास व अस्पृश्यांना शिक्षणास मुकावे लागले."[८] अशी आपल्या सामाजिक इतिहासातील खेदकारक वस्तुस्थितीही ते निदर्शनास आणतात.

दलितांच्या मुक्तीचा तपशिलाने त्यांनी विचार केला आहे. दलित जाती व आदिवासी जमाती यांच्यासंबंधाने मिस्टर एच.टी.स्टार्ट यांच्या अध्यक्षतेखाली सरकारने एक समिती नेमली होती. या समितीपुढे डिसेंबर १९३० मध्ये साक्ष देताना कर्मवीरांनी काही सूचना केल्या आहेत. दलितांनी मृत मांस खाऊ नये. विहिरीतून पाणी काढण्याबाबत त्यांच्यावर जे

निर्बंध आहेत ते कायद्याने दूर करण्याची गरज आहे. दलित वस्त्यांभोवतालची दारूची सगळी दुकाने हलविली पाहिजेत. दलितांसाठी काही खास सहकारी संस्था असल्या पाहिजेत.[९] अशा काही व्यावहारिक सूचना त्यांनी या साक्षीत केल्या आहेत. महार वतनासारखे काही प्रकार अस्पृश्यांनी सोडले पाहिजेत, असेही त्यांनी इतरत्र[१०] सुचविले आहे.

"इतर कितीही अस्पृश्यांचा उद्धार करणारे लोक जन्माला आले तरी अस्पृश्यांनी स्वतःच्या पायावर स्वतः उभे राहिले पाहिजे.... (त्यांनी) 'दे दान सुटे गिराण' ही वृत्ती सोडली पाहिजे. कष्ट करावयास शिकले पाहिजे, तरच अस्पृश्यांचा उद्धार होईल,"[११] असा आत्मनिर्भर होण्याचा स्वावलंबी मार्ग ते दाखवितात. "हरिजनबांधवांची सुधारणा केवळ मंदिरप्रवेशाने अगर कायदे करून होणार नाही. त्यांची आर्थिक परिस्थिती सुधारली पाहिजे व त्यांच्यामध्ये शिक्षणाचा प्रसार झाला पाहिजे,"[१२] असा अस्पृश्यतानिवारणाचा ठोस कार्यक्रमही त्यांनी सुचविला आहे. धर्मांतराच्या चळवळीला त्यांनी पाठिंबा दिला आहे.[१३]

"यापेक्षा अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे इतर हिंदूंनी आपल्या धार्मिक कल्पना पूर्ण झुगारून देऊन विश्वबंधुत्त्वाची भावना धारण केली पाहिजे,"[१४] असा रास्त आग्रहही त्यांनी धरलेला होता.

अस्पृश्यतानिवारणाचे जे कार्य कर्मवीरांनी केले त्यामागील त्यांची दलित संवेदना या पद्धतीची आहे.

### अस्पृश्यतानिवारणाच्या प्रेरणा

दलितांच्या मुक्तीची ही जाणीव कर्मवीरांच्या उपजत मानव्यनिष्ठेचा भाग होती. त्याचप्रमाणे निरनिराळ्या व्यक्ती, विचार यांच्या संस्कारांचा व प्रेरणांचाही तो परिपाक होता.

अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीचे आपले ऐतिहासिक आकलन त्यांनी त्रोटक स्वरुपात मांडले आहे. "अस्पृश्यता हा हिंदुधर्मास लागलेला कलंक आहे. हा कलंक धुऊन काढण्यासाठी अनेक मानवतेच्या पुजाऱ्यांनी आतापर्यंत प्रयत्न केलेला आहे. भगवान गौतमबुद्ध, महावीर, चक्रधर, महात्मा जोतीराव फुले, महर्षी शिंदे, ठक्करबाप्पा या महाभागांनी यावावतीत केलेली कामगिरी अतुलनीय आहे."[१५] याच पत्रात महात्मा गांधी आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या थोरवीचे मर्म त्यांनी अचूकपणे व्यक्त केले आहे. याशिवाय छत्रपती शिवाजीमहाराज, श्री तुकाराम, राजर्षी शाहू आणि गाडगेमहाराज यांच्या या क्षेत्रातील कामगिरीविषयी त्यांनी इतरत्र गौरवोद्‌गार काढले आहेत.

यातील काहींचे कर्मवीरांचे आकलन वैचारिक पातळीवरचे होते. काहींच्या प्रत्यक्ष सहवासाचा ठसा त्यांच्या मनावर उमटला तर काही समानधर्मीयांबरोबर त्यांनी खांद्याला खांदा लावून काम केले. याबाबतीतल्या त्यांच्या जाणिवा साचेबंद किंवा सांप्रदायिक नव्हत्या. अंगभूत प्रवृत्ती, प्रत्यक्ष समाजवास्तव आणि त्या त्या विचाराची प्रस्तुतता (रिलेव्हन्स) यानुसार त्यांच्या धारणा वाढत-विकसित होत गेल्या. त्या प्रवाही, मोकळ्या, लवचिक आणि परिवर्तनशील अशाच होत्या.

### युगप्रवर्तक शिवछत्रपती आणि संत तुकाराम

युगकर्ते छत्रपती शिवाजीमहाराज आणि वारकरी मंदिराच्या कलशस्थानी असलेले श्रीसंत तुकाराम ही मराठी मनाची दैवते कर्मवीरांना सदैव पूजनीय होती. दोन लाखांची देणगी नाकारताना कर्मवीर कडाडले, "एक वेळ मी माझ्या बापाचे नाव बदलीन पण कॉलेजला दिलेले छत्रपती शिवाजी महाराजांचे नाव बदलणार नाही." शिवचरित्राचे गुणगान त्यांनी सातत्याने केलेले आहे. कर्मवीरांनी देह ठेवला तोही शिवजयंतीलाच. शिवशाहीच्या उत्कर्षकाळाचे मूळ त्याकाळच्या सामाजिक एकतेत ते पाहतात. महाराजांची राज्यव्यवस्था ही जातिनिष्ठ नव्हती तर गुणप्रधान होती. जातीपेक्षा व्यक्तीचे गुण हेरून त्यांचा नेमका वापर करण्याचे कसब महाराजांजवळ होते. "शिवाजी लोकांची निवड करताना त्यांच्या कर्तृत्वावर भर देत असे"[१६] हा मुद्दा कर्मवीर आवर्जून मांडतात.

सामाजिक समतेचा संबंध कर्मवीरांनी शिवरायांशी जसा जोडला आहे तसा तो श्री तुकारामांशीही जोडला आहे. कर्मवीरांच्या एकूण विचारसृष्टीत धर्म, ईश्वर यांचा निरपेक्ष विचार करण्याची इहवादी प्रवृत्ती दिसते. त्यामुळे धार्मिक क्षेत्राचे संदर्भ त्यांच्या लिहिण्याबोलण्यात येताना दिसत नाहीत. याला एकमेव अपवाद आहे तो श्री तुकारामांचा. गाडगेमहाराजांचे परमशिष्य आणि वारकरी श्री . पांडुरंग बाळाजी कवडे यांनी लिहिलेल्या तुकाराम-चरित्राची प्रस्तावना दि. २० फेब्रुवारी १९५६ च्या पत्राने कर्मवीरांनी पाठविली. ती तुकोबांविषयीच्या त्यांच्या नेमक्या आकलनाची साक्ष देते. रामदास व तुकाराम यांची वि.ल. भावे यांनी केलेली तुलना अन्यायकारक असल्याचे

त्यांनी निदर्शनास आणले आहे. स्वतः त्यांनी या दोन संतांची वैशिष्ट्यपूर्ण तुलना अन्यत्र केली आहे. तुकोबांच्या सदेह वैकुंठगमनाविषयी त्यांनी साशंकता व्यक्त केली आहे. तुकोबा शूद्र नसून क्षत्रिय असल्याचे त्यांनी ठामपणे प्रतिपादन केले आहे. हाच मुद्दा त्यांनी *लोकमित्र* ही आपली कादंबरी कर्मवीरांना अर्पण करणाऱ्या ना.ह. आपटे यांना त्या कादंबरीवरील अभिप्राय[१८] कळवितानाही मांडला आहे.

तुकारामांच्या जीवनाचे रहस्य जातिभेदातीत वृत्तीच्या पुरस्कारात त्यांनी शोधले आहे. ते म्हणतात, "तुकारामाच्या जीवनाने बहुजनसमाजाला मोक्षाचा मार्ग खुला करून दिला आहे.... सर्वस्वाचा त्याग हे ध्येयसिद्धीचे रहस्य आहे, हे श्री तुकारामाच्या आचरणाने दाखविले आहे. श्री तुकाराममहाराजांनी बहुजनसमाजाला अज्ञात असे अध्यात्मिक ज्ञानाचे भांडार फोडून ते स्त्री-शूद्रादिकांना खुले केले. ज्ञान हे पवित्र, पण ह्या पवित्र ज्ञानाचा अपवित्र उपयोग करून धर्ममार्तंडांनी सामान्य जनता अज्ञानी ठेवून त्याजवर वर्चस्व गाजविले होते. पण वारकऱ्यांच्या ठिकाणी जातिभेद व पक्षभेद नाही. इतकेच काय पण स्त्री-पुरुष असाही भेद भक्तिमार्गात आढळून येत नाही. वर्णाश्रमधर्माने कृत्रिम जातिभेदाचे जे तांडव आरंभले होते त्याला वारकरी संप्रदायाने सुरुंग लावला व विष्णुदास हे जातिभेदातीत आहेत असे त्यांनी आपल्या आचरणाने दाखविले."[१९] हाच मुद्दा मांडताना इतरत्र ते म्हणतात – "खरा सर्वोदयवादी तुकारामच होता. भागवतधर्माचे तत्त्व त्यांनी शिकविले. पंढरपूरच्या वाळवंटात महार-चांभार, गरीब-श्रीमंत सारे भेद विसरून एकत्र होतात. ही संतांची थोर कामगिरी आज आपण विसरून नुसते अभंग म्हणत राहिलो आहोत."[२०] स्त्री-शूद्रांपर्यंत ज्ञान पोहोचविणे, बहुजनांना उद्धाराचा मार्ग दाखविणे आणि सर्व प्रकारचे भेदाभेद त्याज्य मानणे हा तुकाराम-चरित्राचा सामाजिक बोध कर्मवीरांनी ठसठशीतपणे स्पष्ट केला आहे. "तुकारामाने ऐनवेळी जमिनीची मशागत केली म्हणून हिंदुपदपातशाही स्थापन करणारा शिवाजी निर्माण झाला,"[२१] असेही त्यांनी म्हटले आहे. सामाजिक एकता हाच राष्ट्रीय उत्कर्षाचा पाया असतो, असे ते सुचवीत आहेत. सामाजिक समरसतेत कर्मवीर तुकोबांचे जीवनरहस्य पाहत आहेत.

तुकारामांच्या चरित्रात विद्रोहाची धग आहे आणि कर्मवीरांना ती जाणवली होती. यात शंका नाही. याचा एक अप्रत्यक्ष पुरावा असा की, ब्राह्मणी मनोवृत्तीला झोंबणारी तुकारामांची विद्रोही वृत्ती स्पष्ट करताना अडथळे येतात, म्हणून कर्मवीरांना त्यात लक्ष घालण्याविषयी विख्यात संशोधक वा.सी. बेंद्रे यांनी केलेली विनंती होय. याच पत्रात वा.सी. बेंद्रे पुढे म्हणतात, "आपण एकदा तरी वेळ काढून मी करीत असलेले काम पाहून माहिती घ्यावी, अशी माझी इच्छा आहे. आपणांस माहिती मिळताच तिचा उपयोग पुष्कळ आहे याची खात्री होईल. Social Reconstruction चे आद्य प्रवर्तक म्हणून तुम्हांला तुकोबांचे कौतुक करावे लागेल. तरी वेळात वेळ काढून पाहून जावे."[२२] तुकोबा आणि कर्मवीर यांच्यात सामाजिक पुनर्रचनेचा समान धागा जाणवल्यामुळेच बेंद्रे यांनी अशी विनंती केली, हे उघड आहे. आपल्या या परंपरागत वारशातूनही आवश्यक ते सत्त्व कर्मवीरांनी आत्मसात केलेले होते.

### राजर्षी छत्रपती शाहू

"छत्रपती शाहू बोर्डिंग हाऊस" असे कर्मवीरांच्या पहिल्या वसतिगृहाचे नामकरण करताना महात्मा गांधींनी काहीशा कुतूहलाने विचारले होते, "शाहू छत्रपतींनी आपल्याला किती पैसे दिले?" त्यावर कर्मवीर म्हणाले होते, "मी त्यांच्याकडून पैसे वगैरे काही आणले नाहीत. लेकिन उनसे बडा दिल लाया हूँ।" दीनदलितांच्या कळवळ्याने भरून येणारे आणि अन्याया-विरुद्ध धगधगून उसळणारे अंतःकरण कर्मवीरांना लाभले ते राजर्षी छत्रपती शाहूंच्या सहवासात. आपल्या काळाच्या फार पुढे असणारा हा राजा होता. सत्यशोधकीय विचारांचा मूर्त आविष्कार त्यांच्या रूपाने भाऊरावांसमोर होता. घडणीच्या अत्यंत संवेदनक्षम वयात त्यांना शाहूराजांजवळ राहण्याची संधी मिळाली. हे संस्कार कर्मवीरांच्या अंगांगात मुरलेले दिसतात.

स्वतः राजर्षी अस्पृश्यता पाळीत नसत. आपल्या प्रजेने ती पाळू नये असा त्यांचा प्रयत्न असे. त्या काळाच्या मर्यादेत अस्पृश्यांसाठी जे जे करता येणे शक्य होते ते सारे त्यांनी केले. त्यांना शिक्षणात सवलती दिल्या. त्यांच्यासाठी स्वतंत्र वसतिगृह काढले. नोकऱ्यांमध्ये त्यांच्यासाठी काही जागा राखीव ठेवल्या. स्पर्शास्पर्शाची बंधने शिथिल होतील असे कल्पक उपक्रम राबविले.

भाऊरावांनी हे सारे पाहिले होते. त्याचा उच्चार त्यांनी वेळोवेळी केला आहे. "शाहूमहाराजांची शिकवण व्यापक आहे.






महाराष्ट्रात राहणारा तो मराठा या भूमिकेवरून त्यांनी सर्वांसाठी सामाजिक कार्य केले."[२३] "कोल्हापूर संस्थानने व शाहूमहाराजांनी अस्पृश्यतानिवारणाचे महान कार्य केले आहे. त्यांनीच महार वतने नष्ट करून महार समाजाला समानतेचे हक्क दिले."[२४] "महाराजांनी बहुजनसमाजासाठी पुष्कळ गोष्टी केल्या. त्यांपैकी अस्पृश्यतानिवारण व शिक्षण ही बाब (त्यांनी) अत्यंत नेटाने चालविली होती."[२५] "छत्रपती शाहूमहाराज यांच्याकडून मला बहुजनसमाजाची सेवा करण्याची व अस्पृश्यता निवारण करण्याची शिकवण मिळाली. तेच माझे स्फूर्तिस्थान आहे."[२६] शाहूमहाराजांनी कणखर वृत्ती निर्माण केली[२७] त्यामुळे आपण अंगीकृत कार्यात यशस्वी होऊ शकलो, असे त्यांनी म्हटले आहे.

आपण शाहूमहाराजांचेच काम पुढे चालवीत आहोत, अशी कर्मवीरांची भावना होती आणि लोकांचीही तशी समजूत होती. या दृष्टीने क्षात्रजगद्गुरूंचे पत्र पाहण्यासारखे आहे. ते म्हणतात – "बहुजनसमाजात शिक्षणप्रसार करणे, अस्पृश्यता समूळ नष्ट करणे, जातिभेद नाहीसा करून सर्व हिंदी समाजात ऐक्य निर्माण करणे ही राजर्षी श्री शाहूमहाराज यांची मुख्यतः तिन्ही ध्येये आपण स्थापन केलेल्या श्री छत्रपती शाहू बोर्डिंग हाऊस, सातारा या संस्थेकडून चालविली जात असल्याने ही संस्था राजर्षी श्री शाहूमहाराज छत्रपती यांचे खरेखुरे स्मारक आहे, यात संशय नाही,"[२८] असा गौरव करून प्रतिवर्षी रू. पंचवीस प्रसादादाखल देण्याचा संकल्प श्री क्षात्रजगद्गुरू करवीर यांनी व्यक्त केला.

### महात्मा फुले

शाहूमहाराजांच्या सहवासात आणि कोल्हापूरच्या सत्यशोधकी वातावरणात भाऊरावांना महात्मा फुले यांच्या सर्वव्यापी विचारांचे मर्मग्राही आकलन झाले. ".... समाज दुभंगलेला आहे ही गोष्ट शंभर वर्षांपूर्वी महात्मा जोतीराव फुले यांनी सांगितलेली आहे. यादृष्टीने त्यांचे कार्य फार मोठे आहे व त्यांची तत्त्वे आजच्या समाजघटनेला उपयोगी पडणारी आहेत.....आमच्या धर्मात हजारो वर्षे गुलामगिरीत वाढलेल्या अस्पृश्यवर्गाचे दास्यविमोचन करण्याचे खरे कार्य मात्र महात्मा फुले यांनीच केले."[२९] त्यांनी "... महाराष्ट्रातील बहुजनसमाजाच्या विचारात मोठी क्रांती केली आहे. स्त्रिया व मागासलेले वर्ग यांच्या शिक्षणाची पहिली सुरुवात त्यांनी केली."[३०] "महाराष्ट्रात आज बहुजनसमाजात जी सर्वांगीण जागृती दिसते व जो शिक्षणप्रसार दिसतो तो सत्यशोधक चळवळीमुळेच दिसत आहे,"[३१] असा कर्मवीरांचा विश्वास होता.

महात्मा फुले यांच्या कार्याची व्यापकता, त्याचे परिणाम आणि अस्पृश्यांच्या दास्यविमोचनाचे महत्त्व त्यांनी जाणले होते. शाहूमहाराजांच्या संस्कारातून झिरपत आलेला फुल्यांचा वारसा त्यांनी श्रद्धेने मिरविला. "महाराष्ट्राचे मार्टिन ल्यूथर गुरुवर्य जोतीबा फुले यांच्या संदेशाप्रमाणे हिंदू समाजातील स्त्री व अस्पृश्य या दलितांचा शिक्षणाने उद्धार करणे हे मी माझे जीवितकार्य मानले आहे,"[३२] असे कर्मवीरांनी गांभीर्याने आणि श्रद्धेने म्हटले आहे.

रयत शिक्षण संस्थेचा जन्म सत्यशोधक समाजाच्या मुशीत झालेला आहे. अज्ञान आणि दारिद्र्य यांची जोडीच असते आणि त्यातील एक दुसऱ्याचे मूळ असते. जातिभेद समाजाच्या चिरफाळ्या करतो. माणसाचे आयुष्य, त्याची इच्छा आणि पात्रता नाकारून, जन्मापासून मरणापर्यंत बांधून टाकतो. अस्पृश्यता माणसाला गुलाम बनविते. त्याचे मनुष्यत्व नाकारून त्याला पशूच्या पातळीवर आणते. हे जाणून महात्मा फुले यांनी त्याविरुद्ध सत्यशोधकाचा झेंडा उभारला. सर्व प्रकारच्या बंधनातून मुक्तता, व्यक्तीचे स्वातंत्र्य, ज्ञानाची उपासना आणि नव्या समाजरचनेचा पाया म्हणून सत्य, समता आणि न्याय या मूल्यांचा स्वीकार हे महात्मा फुले यांच्या विचारसरणीचे सार होते.

केवळ वाचनातून नव्हे तर भोवतालच्या जीवनाच्या अनुभवातून कर्मवीर या भूमिकेपर्यंत आले. अज्ञान आणि विषमता यांच्याविरुद्ध ज्ञान आणि श्रमसंस्कार या हत्यारांनी त्यांनी झुंज दिली. त्यांची रयत शिक्षण संस्था केवळ पाठ्यक्रमाचे शिक्षण देणारी संस्था नव्हती. ती 'सामाजिक परिवर्तनाची प्रयोगशाळा' होती. महात्मा फुले यांच्या विचारांचे पाझर कर्मवीरांनी समाजाच्या तळापर्यंत पोहोचविले आणि सामाजिक पुनर्घटनेला गती दिली.

### महात्मा गांधी

ज्या काळामध्ये रयत शिक्षण संस्थेचा जन्म झाला आणि ती वाढू लागली तो काळ भारतीय राजकारणातील महात्मा गांधीजींच्या प्रवेशाचा आणि प्रभावाचा काळ होता. साहजिकच कर्मवीरही महात्माजींच्या प्रभावकक्षेत ओढले गेले. गांधींचे भाषण ऐकून भाऊरावांनी आपल्या अंगावरील परदेशी कापडांची






होळी केली आणि आजन्म स्वदेशीचे व्रत घेतले. तेव्हापासून गांधीजींविषयींचे त्यांचे आकर्षण वाढतच गेले.

गांधीजींची निर्विवाद थोरवी त्यांना मनापासून जाणवली होती. "जगात आजपर्यंत पुष्कळ धर्मसंस्थापक व महात्मे होऊन गेले आहेत. परंतु मानवप्राण्याच्या स्वास्थ्याच्या दृष्टीने महात्मा गांधींच्या इतका मोठा व यशस्वी प्रयोग अखिल जगतात अजून कोणीही केला नाही, असे माझे मत आहे."[३३] कम्युनिझममध्ये आर्थिक उन्नतीचे महत्त्वाचे तत्त्व आहे. गांधीजींच्या विचारात आर्थिक उन्नतीबरोबर मानसिक उन्नतीचेही तत्त्व आहे. कम्युनिझमपेक्षा महात्मा गांधींची तत्त्वे फार मोठी आहेत, अशी कर्मवीरांची धारणा होती. "अखिल जगातील मानवप्राण्याचे कल्याण जर व्हावयाचे असेल तर महात्मा गांधींच्या तत्त्वांचा जगात प्रसार व्हावयास पाहिजे",[३४] असे त्यांना वाटे. "गांधीजींच्या, सर्व सुखाचे आगर अशा थोर तत्त्वज्ञानाची व्यवहारी शिकवण"[३५] देण्याच्या उद्देशाने "महात्मा गांधी विश्वविद्यालय" स्थापण्याचे त्यांचे स्वप्न होते.

महात्माजींच्या अनुयायित्वाची भूमिका कर्मवीरांनी आदरपूर्वक घेतलेली दिसते. "महात्मा गांधींच्या अहिंसा व सत्य ह्या तत्त्वांबद्दल मला फार आदर असून मी त्यांचा यावावत सक्रिय शिष्य आहे."[३६] "पुण्यश्लोक गांधीजी हे या संस्थेचे अढळ स्फूर्तिस्थान आहे.... महात्माजींचा आजन्म अनुयायी होण्यात मला धन्यता वाटते."[३७] हे अनुयायित्व केवळ वाचाळ नाही तर क्रियाशील आहे.

"राष्ट्रपिता महात्मा गांधी यांनी देशाच्या उन्नतीसाठी जी अनेक विधायक कामे केली, त्यांपैकी हरिजन उद्धार हे पहिल्या क्रमांकाचे काम होय."[३८] हे काम "विशाल प्रमाणावर केलेले आणि "सर्वात महत्त्वाचे"[३९] आहे, असेही कर्मवीरांनी नमूद केले आहे.

"स्पृश्यास्पृश्यता किंवा जातीयता मानणार नाही, अशी मी महात्मा गांधींच्या जवळ शपथ घेतली आहे,"[४०] असे ते म्हणत असले तरीही गांधींजींची गाठ होण्याच्या कितीतरी आधीपासून या तत्त्वाचे ते सहजपणे पालन करीत होते. तेव्हा ही शपथ म्हणजे एक महामानवाच्या साक्षीने अंतःकरणाला प्रतीत झालेल्या शुभ संकल्पाचा प्रकट उच्चार होता असेच म्हटले पाहिजे. गांधीजींच्या प्रभावाने पूर्वीपासून स्वीकारलेला हरिजनोद्धाराचा विधायक उपक्रम कर्मवीरांनी अधिक जोमाने अंगीकारला. आपल्या पहिल्या सर्वजातीधर्मीय वसतिगृहाचे नामकरणही त्यांनी आवर्जून आणि काहीशा सत्याग्रही हट्टाने महात्माजींच्या हस्तेच केले.

गांधीजींनाही कर्मवीरांच्या कार्याचे कौतुक होते. "भाऊराव पाटील की सेवा ही उनका सच्चा कीर्तीस्तंभ है।"[४१] अशा यथोचित शब्दांत ते व्यक्त झाले आहे. आपल्या हरिजन सेवक संघाच्या निधीतून त्यांनी भाऊरावांना मदतही केली. पत्रव्यवहाराने उभयतांचा संबंध अखेरपर्यंत राहिला आणि समान स्नेही-शिष्यांनी तो वाढता ठेवला. गांधीजींचे स्मरण कर्मवीरांना नवनव्या संकल्पांत आणि त्यांच्या पूर्तीसाठी झटण्यास सहायक ठरले. सवर्ण आणि अस्पृश्य यांच्या दिलजमाईसाठी गांधीजींनी केलेल्या प्रदीर्घ उपोषणाची स्मृती म्हणून त्यांनी पुण्याला "युनियन बोर्डिंग हाऊस" काढले आणि आपल्या सर्व शाखांमध्ये अस्पृश्यांसाठी पन्नास टक्के जागा राखून ठेवण्याचा संकल्प सोडला. गांधीजींचे कृतिशील स्मारक म्हणून त्यांनी एकशे एक माध्यमिक विद्यालयांची साखळी गुंफली.

**ठक्करबाप्पा**

महात्मा गांधी आणि कर्मवीर पाटील यांना जोडणारा एक दुवा म्हणजे हरिजनसेवक संघाचे कळकळीचे कार्यकर्ते ठक्करबाप्पा. त्यांच्या जीवनकार्याचे मूल्यन कर्मवीरांनी केले आहे, ते असे – "ठक्करबाप्पा यांनी आपल्या हयातीमध्ये अस्पृश्यतानिवारण या कार्याकडेच सर्वस्वी लक्ष दिले. त्यांचा उद्धार करण्यासाठी त्यांनी हरिजनांच्या सर्व जातिजमाती फिरून त्यांचा अभ्यास केला. त्यांचे खरेखुरे गाऱ्हाणे महात्माजींच्या कानी घातले... त्यांनी काँग्रेसतर्फे अस्पृश्यतानिवारण हा प्रश्न धसास लावला त्याचे श्रेय पूज्य ठक्करबाप्पा यांना आहे."[४२] "शिक्षणक्षेत्रात मी जे काही अल्पस्वल्प करण्याकरिता प्रवृत्त झालो आणि या कार्यात माझी जी स्फूर्तिस्थाने आहेत त्यांपैकी ठक्करबाप्पा हे एक होत."[४३] असेही कर्मवीरांनी नमूद केले आहे.

खालच्या वर्गातील मुलांच्या शिक्षणासाठी १९२४ पासून भाऊरावांनी साताऱ्याला एकाग्रतेने काम करण्यास सुरुवात केली. त्यानिमित्ताने हरिजनसेवक संघाचे श्री. गोपाल कृष्ण देवधर यांच्याशी त्यांचा संबंध आला. देवधरांमुळे ठक्करबाप्पांनी भाऊरावांचे वसतिगृह पाहिले आणि प्रसन्न होऊन गांधीजींना कळविले, "आपल्या तत्त्वाप्रमाणे हरिजनच काय पण हिंदु-मुसलमानांचे ऐक्य कसे साधता येईल, हे इथे शिकविले जात आहे." या पार्श्वभूमीमुळेच साताऱ्च्या बोगद्याजवळ जुना पुणे-

बंगलोर मार्ग अडवून उभ्या राहिलेल्या भाऊरावांचा आणि त्यांच्या विद्यार्थ्यांचा आग्रह बापूजींनी मानला आणि वसतिगृहाच्या नामकरण समारंभाचे आमंत्रण स्वीकारले. त्यातूनच महात्मा गांधी आणि रयत शिक्षण संस्था यांचे आंतरिक नाते घट्ट होत गेले. "गांधींच्या पर्यंत आमच्या संस्थेच्या समाजसेवेचा दुवा जोडण्याचे काम ठक्करवाप्पांनी केले याबद्दल संस्था त्यांची ऋणीच राहील,"[४४] असे कर्मवीरांनी कृतज्ञतापूर्वक नोंदविले आहे.

कोयनेच्या परिसरातील डोंगराळ भागात, आडवळणी गावात कर्मवीरांनी काही शाळा उघडल्या होत्या. १९४५ साली कधी बैलगाडीतून जाऊन तर कधी पायी फिरून ठक्करवाप्पांनी या शाळा पाहिल्या. त्यांतील काही शाळा अस्पृश्य शिक्षकांकडून चालविल्या जात होत्या. सामान्य, निरक्षर माणसांमध्येही अस्पृश्यता नाकारणारी सहज माणुसकीची भावना निर्माण झाल्याचा आल्हाददायक अनुभव ठक्करवाप्पांना या भागात फिरताना आला, असे कर्मवीरांनी स्वतःच नमूद[४५] करून ठेवले आहे.

मागासलेल्या वर्गाच्या समितीचे सभासद म्हणून कर्मवीरांनी सलग दहा वर्षे ठक्करवाप्पांच्या जोडीने काम केले. कर्मवीरांनी केलेल्या कामाच्या आरंभापासून तो ठक्करवाप्पांच्या निधनापर्यंत हरिजनोद्धाराच्या कार्यात दोघांची साथसंगत अखंड राहिली.

### महर्षी विठ्ठल रामजी शिंदे

महर्षी विठ्ठल रामजी शिंदे आणि कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या स्नेहाचा एक धागा अस्पृश्यांविषयी उभयतांना असलेली आस्था हाच होता. दलितांच्या, उपेक्षितांच्या उद्धाराची आणि सर्वांगीण कल्याणाची जिवंत आणि जातिवंत तळमळ महर्षींच्या कोणत्याही लेखनातून दिसल्याशिवाय राहत नाही, असे कर्मवीरांना जाणवले. महर्षींच्या अशाप्रकारच्या कृतीत तर कर्मवीर सहभागी होतेच. महर्षींच्या 'डिप्रेस्ड क्लास मिशन' चे ते क्रियाशील कार्यकर्ते व मार्गदर्शक होते. महर्षींचेही कर्मवीरांच्या कार्याकडे बारीक लक्ष होते. आजीवन रयत शिक्षण संस्थेला वाहून घेणाऱ्या तरुणांच्या समर्पण-समारंभाचे अध्यक्ष महर्षीच होते. आपल्याला जे यश मिळाले नाही ते भाऊरावांना मिळाले, अक्रोडाच्या झाडापेक्षा भाऊरावांच्या कार्याला लवकरच फळे लागली, असे साफल्याचे उद्‌गार त्यांनी काढले होते. शिक्षण आणि अस्पृश्यतानिवारण ह्याविषयीच्या उपक्रमात दोघे बरोबरच राहिले.

### गाडगेमहाराज

मराठी संतपरंपरेच्या संदर्भात गाडगे महाराजांचा विचार कर्मवीर करतात. तो त्यांच्या इहवादी आणि ज्ञाननिष्ठ भूमिकेचे दर्शन घडवितो. ते म्हणतात,' महाराष्ट्राच्या इतिहासात संतांनी फार मोलाची कामगिरी केली आहे. संत नामदेव व संत तुकाराम यांचीच परंपरा आज श्रीसंत गाडगे महाराज, श्रीसंत कैकाडी महाराज व महाराष्ट्रातील इतर संत चालवीत आहेत... श्रीसंत गाडगे महाराजांनी अनेक ठिकाणी मठांची स्थापना केली. पण मला असे म्हणावयाचे आहे की, संतांनी मठाऐवजी शाळा बांधण्याचा प्रयत्न करावा. ही माझी विचारसरणी प्राचीन संतांच्या एकंदर विचारापेक्षा अगदीच निराळी आहे असे मानण्याचे कारण नाही. कारण प्राचीन काळी संतांनी जे लोकसेवेचे कार्य केले तेच कार्य आजच्या काळाला अनुसरून आम्ही शिक्षणाद्वारे करीत आहोत.... माझे ठाम मत आहे की, कोणत्याही गावात असलेल्या देवळापेक्षा शाळेला खास अधिक महत्त्व मिळाले पाहिजे. कारण देवळात केवळ एक दगडाची मूर्ती असते पण शाळामंदिरात अनेक जिवंत विठ्ठलाच्या मूर्ती असतात. देशाचे खरे कार्य म्हणजे शाळेतील विठ्ठलाचे शिक्षण होय."[४६]

या "शाळेतील विठ्ठलाचे शिक्षण" गाडगेबाबांनाही नंतर महत्त्वाचे वाटू लागले आणि त्यांनीही कर्मवीरांना यथाशक्ती साहाय्य केले. श्रीक्षेत्र पंढरपूर येथील "संत चोखामेळा धर्मशाळे"ची इमारत आणि उरलेल्या पंधरा हजार रुपयांचा फंड यांची व्यवस्था मॅनेजिंग ट्रस्टी म्हणून कर्मवीरांनी पाहावी, अशी गाडगेबाबांची इच्छा होती. "धर्मशाळेची व रकमेची व्यवस्था हरिजन लोकांच्या फायद्यासाठी करणे"[४७] असे आपले मनोगतही त्यांनी कळविले होते. गाडगेबाबांसारखे सत्पुरुष कर्मवीरांकडे दलितांचे हितचिंतक म्हणून पाहत होते, याची ही साक्ष आहे. कर्मवीरांनी ही जबाबदारी पुष्कळ वर्षे सांभाळली. पुढे बाबांनी ही धर्मशाळा कायमची डॉ. आंबेडकरांच्या स्वाधीन केली.

गाडगेबाबांविषयी कर्मवीरांना जिव्हाळा आणि आदर होता. "मी आपला एक वरिष्ठ गुरुबंधू आहे. आपल्या सहवर्तमान, आपणास घेऊन, त्या मार्गाची वाटचाल करण्यात मी आनंदाने कधीही तयार आहे."[४८] असे ते मिशनच्या कार्यकर्त्यांना सांगत आणि त्याप्रमाणे वागत. मिशनच्या कार्यकर्त्यांना कर्मवीरांचा मोठाच आधार वाटे. अशा बोलक्या

अनुक्रमणिका

कृतज्ञतेसाठी पुढील पत्र पाहण्यासारखे आहे. "गेल्या कार्तिकीच्या वेळी पंढरपुरी येऊन आपण जे मार्गदर्शन केले ते संघटनेच्या व भावी कार्याच्या दृष्टीने आत्यंतिक महत्त्वाचे होते. आपल्यासारख्यांचा असा अधिकार आहे की, सेवाकार्यातील स्वानुभवी अशा अमृततुल्य उपदेशाने जिज्ञासू अशा आम्हा सेवकांची मते तयार होऊन सेवाकार्यामध्ये सर्वभावे करून स्वात्मार्पण करण्याची स्फूर्ती आपणासारख्यांच्याकडे पाहूनच मिळते."[४९] (यथामूल, "मिळावी" असे हवे) अस्पृश्यांची सेवा हा गाडगेमहाराज आणि कर्मवीर यांना जोडणारा एक महत्त्वाचा अनुबंध होता.

### डॉ. बाबासाहेब आंबेडकर

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारखे पुढारी जनतेस दीपस्तंभासारखे मार्गदर्शक असतात, अशा शब्दांत कर्मवीर बाबासाहेबांचा गौरव[५०] करतात. त्यांच्या कार्याचे महत्त्व मान्य करीत असतानाच "हरिजनांकरिता काँग्रेसने काहीच केले नाही" हा बाबासाहेबांचा आरोप मात्र कर्मवीरांना तितकासा पटत नाही. काँग्रेसने हरिजनांसाठी जे केले ते थोडेसे असले तरी ती काळाची व परिस्थितीची मर्यादा आहे, असे कर्मवीरांनी सुचविले[५१] आहे.

भारताला स्वातंत्र्य मिळवून देणे हे गांधीजींचे जीवनध्येय होते. राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळीला त्यांनी सामाजिक आंदोलनाची जोड देऊन अधिक व्यापक केले. ग्रामोद्योग, हिंदू-मुस्लिम ऐक्य, स्त्रीदास्यविमोचन आणि हरिजनोद्धार असे कार्यक्रम त्यांनी राबविले. अस्पृश्यता हा हिंदूधर्मावरील कलंक आहे, ही त्यांची धारणा प्रामाणिक होती. तथापि, समाजातील निरनिराळ्या घटकांना आत्मभान येत असताना त्यांच्या आपापसातील संघर्षाने राजकीय ऐक्याला तडा जाऊ नये, याचीही त्यांना काळजी होती. त्यामुळे अस्पृश्यतानिर्मूलनासाठी त्यांनी सामूहिक चळवळ उभी केली नाही किंवा सामुदायिक सत्याग्रहाचा कृतिशील मार्ग चोखाळला नाही. अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांचा वेगळा विचार करण्याची त्यांना गरज वाटली नाही. सवर्णांच्या मतपरिवर्तनावर त्यांनी भर दिला. त्यामुळे अस्पृश्यांसाठी वसतिगृह किंवा शाळा काढणे, विहिरी व मंदिरे खुली करण्यासाठी सवर्णांची मते वळविणे इतपतच त्यांची चळवळ मर्यादित राहिली. गांधीजींच्या अस्पृश्योद्धाराच्या कार्याला असलेली काळाची व परिस्थितीची मर्यादा ती हीच.

अस्पृश्यांना समान हक्क मिळवून देणे हे डॉ. आंबेडकरांचे जीवितध्येय होते. हरिजनोद्धाराच्या सुधारणावादी चळवळीचे मिळमिळीत धोरण व संथ गती त्यांना न मानवणारी होती. अस्पृश्यता हा आमच्या देहावरील कलंक आहे आणि प्रसंग पडल्यास आमच्या रक्ताने आम्ही तो धुऊन काढू, अशी संघर्षाची भूमिका त्यांनी घेतली. त्यामुळे त्यांच्या चळवळीला एक भावनिक आवेग आला. शिका, संघटित व्हा आणि लढा हा त्यांचा मंत्र होता. शिक्षण, संघटन आणि धर्मांतर ही त्यांच्या चळवळीची तीन प्रमुख अंगे होती. अस्पृश्यांचे रास्त हक्क त्यांना मिळवून देण्यासाठी चवदार तळ्याचा सत्याग्रह किंवा मंदिरप्रवेशासारखे कृतिशील कार्यक्रम त्यांनी हाती घेतले. पण त्यातील अडचणी लक्षात आल्यावर अस्पृश्यांच्या स्वतंत्र राजकीय हक्कावर त्यांनी आपले लक्ष केंद्रित केले. ते विचलित होऊ नये म्हणून प्रसंगी अस्पृश्योद्धाराच्या निव्वळ सामाजिक आणि धार्मिक पातळीवरील चळवळींना विरोध करण्याची आवश्यकताही[५२] त्यांनी प्रतिपादन केली.

राजकीय हक्कावर बाबासाहेबांनी अशा तऱ्हेने भर दिला. आयुष्याच्या पूर्वार्धाचा भाग सोडला तर, राजकारणापासून शक्य तितके अलिप्त राहण्याचे कर्मवीरांचे धोरण होते. तथापि त्यांच्या ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वाचा लोकमानसावर एवढा दांडगा प्रभाव होता की, प्रत्यक्ष-अप्रत्यक्षरीत्या तो राजकारणावरही जाणवत असे. त्यातून काही वेळा ताण निर्माण होई. डी.डी. घोलप, रामभाऊ नलावडे, ल.बा. भिंगारदिवे असे अनेक शासननियुक्त किंवा निवडणुका लढविणारे अनेक मागासवर्गीय तरुण काँग्रेसशी आणि संस्थेशी संबंधित होते. साहजिकच आंबेडकरवादी उमेदवारांशी त्यांचा सामना अटळ असे. त्यामुळे मागासवर्गीय विद्यार्थ्यांनी भाऊरावांच्या संस्थेत शिक्षण घेऊ नये, असाही पवित्रा अगदी क्वचित का होईना पण आंबेडकरवाद्यांनी घेतलेला दिसतो.

तथापि या गोष्टी प्रासंगिक आणि तात्कालिकच राहिल्या. बाबासाहेबांना राजकीय साहाय्य करण्याचा प्रयत्न कर्मवीरांनी केल्याची उदाहरणे आहेत. नारायणराव काजरोळकर यांच्या पत्रात त्यांनी लिहिले आहे, "आपण चालू निवडणुकीमध्ये डॉ.बी.आर. आंबेडकर यांच्याविरुद्ध उभे राहू नये, असे मी आपणांस सांगितले होते. त्याला आपण संमती दिली होती. परंतु पक्षाच्या आदेशावरून आपल्याला उभे राहावे लागले, हे मला समजले आहे."[५३] कर्मवीर आणि डॉ. आंबेडकर या दोघांनाही "अंतरीची खूण" पटलेली होती. दोघांनाही








एकमेकांविषयी आपुलकी आणि कार्याविषयी आदर होता.

कर्मवीरांची सामाजिक दृष्टी महात्मा गांधींपेक्षा डॉ. आंबेडकरांशी अधिक जुळणारी होती. तरीही गांधीवादी संस्कार आणि राजकीय मतभिन्नता यामुळे त्यांच्या कार्याची दिशा काहीशी वेगळी झाली. या भिन्नतेचे मूळ या दोघांच्या सामाजिक स्थानात होते, असे धनंजयराव गाडगीळ[५४] यांनी प्रतिपादन केलेले आहे. मधल्या जातीचे लोक जेव्हा ब्राह्मणांविरुद्ध उठाव करतात तेव्हा त्यांना अस्पृश्यांसह सर्वांचा पाठिंबा मिळतो. त्यामुळे त्यांचा पवित्रा आक्रमक होऊ शकतो. पण मधल्या जातीचे लोक जेव्हा अस्पृश्यांचा कैवार घेतात तेव्हा त्यांना केवळ ब्राह्मणांशीच नव्हे तर स्व-जातीयांशीही लढावे लागते. त्यामुळे त्यांचा पवित्रा अस्पृश्योद्धाराच्या चळवळीत तितकासा आक्रमक राहू शकत नाही. याउलट, अस्पृश्यांना केवळ ब्राह्मणविरोधाचीच नव्हे तर सवर्णांच्या विरोधाचीही भूमिका घ्यावी लागते. अल्पसंख्य असल्याने अशी भूमिका अस्पृश्यांना संघटित बळावर आणि संघर्षाच्या जिद्दीने घ्यावी लागते. या फरकामुळे डॉ. आंबेडकरांच्या कार्याला दलितनिर्मूलनाच्या आक्रमक चळवळीचे रुप येऊ शकले तसे इतरांच्या कार्याला येऊ शकले नाही. कर्मवीरांचे कार्यही अस्पृश्यतानिवारणाच्या सुधारणावादी चळवळीच्या मर्यादेतच राहिले.

डॉ. आंबेडकरांचे हे वेगळेपण कर्मवीरांनाही जाणवलेले आहे. "पायाला बोचते कुठे हे चालणारासच समजते त्याप्रमाणे अखिल दलितवर्गाच्या काय अडचणी आहेत, हे त्यांच्यामधील व्यक्तींनाच जास्त समजू शकेल."[५५] दलितांसाठी सर्वस्व अर्पण केले म्हणून डॉ. आंबेडकर दलितांचे खरेखुरे व एकमेव पुढारी ठरतात. असा एकही पुढारी काँग्रेसमध्ये नाही, अशी निःशंक ग्वाही[५६] कर्मवीरांनी दिलेली आहे. "डॉक्टरसाहेब हे एक युगपुरुष होऊन गेले... डॉक्टरसाहेब यांनी अभूतपूर्व विद्वत्ता मिळविल्यानंतर स्वतःच्या (समाजाच्या) समस्या सोडविण्यास मोठ्या महत्त्वाकांक्षेने पुढे आले. अस्पृश्यतेच्या अन्यायामुळे निपचित पडलेल्या समाजात बाबासाहेबांनी अपूर्व जागृती केली. त्यांच्या अंतःकरणात स्वाभिमानाची ज्योत पेटविली. विषमता व अन्याय या विषयी मनस्वी चीड निर्माण केली. हे करीत असताना त्यांच्यावर अनेक संकटांचे डोंगर कोसळले. परंतु तत्त्वाच्या घोषणेच्या आवाजाने व दुर्दम्य आशावादाने त्या डोंगरांची मातीमाती झाली."[५७] अशा शब्दांत कर्मवीरांनी बाबासाहेबांचे मोठेपण वर्णन केले आहे.

कर्मवीरांच्या कार्याविषयी बाबासाहेबांच्या मनातही आदर आणि जिव्हाळा होता. शाहू बोर्डिंगला भेट दिल्यावर त्यांनी म्हटले होते, "It is an unique institution and deserves support of every man who cares for the best interest of this nation"[५८] हा अभिप्राय १९२८चा आहे. कर्मवीरांच्या कार्याच्या आरंभापासून बाबासाहेबांच्या महानिर्वाणापर्यंत या युगधुरंधर सत्पुरुषाचे संबंध असे आपुलकीचे होते.

शिक्षणक्षेत्रात रमलेल्या कर्मवीरांना बाबासाहेबांचा वेगळाच पैलू महत्त्वाचा वाटतो. ते म्हणतात, "... त्यांची विद्वत्ता ही मला विशेष वाटते. प्रत्येक तरुणाने डॉक्टरांचा आदर्श समोर ठेवून आपला अभ्यास पूर्ण करावा."[५९] आपल्या विद्यार्थ्यांसमोर कर्मवीरांनी ज्ञानसाधनेत अखंड मग्न असलेल्या ब्रह्मर्षी डॉ. आंबेडकरांची प्रतिमा आदर्श म्हणून ठेवली.

### स्वानुभवाची आच व आचरणातील इमान

भाऊरावांवर विविध विचार आणि व्यक्ती यांचे संस्कार झाले. त्यातून त्यांची दलित संवेदनशीलता सूक्ष्म आणि धारदार होत गेली. तरीही हे सर्व संस्कार स्वीकारणारे असे जिवंत मन त्यांच्याजवळ होते, हे विसरून चालणार नाही. "मी गेल्या पन्नास वर्षांपासून स्वयंस्फूर्तीने हरिजनोद्धाराचे कार्य एकसारखे करीत आहे."[६०] "विशेषतः अस्पृश्यता नष्ट करणे व बहुजन समाजाच्या मुलांना त्यांच्या राहत्या ठिकाणाजवळ दुय्यम व उच्च शिक्षणाची अगदी अल्प खर्चात सोय करण्याचा (मी) प्रयत्न केलेला आहे,"[६१] असे त्यांनी म्हटले आहे आणि ते खरेही आहे.

त्यांची वृत्ती उपजतच धर्मातीत होती. त्यामुळे रूढी, अंधश्रद्धा, पंथ, धर्म इत्यादी भेदांच्या जाळ्यात ते कधी सापडले नाहीत. आपल्या स्वतःच्या जातिधर्माचा ते कधी उल्लेखही करीत नसत. जात, वर्ग, परिसर अशा कोणत्याही कारणाने माणसामाणसांमध्ये भेदभाव करणारी कोणतीही व्यवस्था त्यांना कधी मानवली नाही. शुद्ध मानव्यनिष्ठा हाच अशा मनाचा गाभा असतो. बुद्धिप्रामाण्यातून आलेली समतेची जाणीव आणि अंतःकरणाला प्रतीत झालेला बंधुभाव यावरच अशा मानव्यनिष्ठेचे पोषण होत असते. त्यामुळे जातीपातींचा वाराही भाऊरावांच्या मनाला कधी शिवला नाही. माणसामाणसांतील एकत्वाची त्यांची जाणीव अगदी नैसर्गिक होती. अन्याया-

विरुद्धची वंडखोरी त्यांच्या रक्तातच होती. ते संपत्तीपुढे झुकले नाहीत. सत्तेपुढे नमले नाहीत. स्वतःच्या मनाला पटणारी प्रत्येक गोष्ट त्यांनी निर्भयपणे केली आणि न पटणाऱ्या कोणत्याही गोष्टीशी सामना द्यायला मागेपुढे पाहिले नाही. त्यांनी केलेल्या अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यात त्यांच्यावरील विविधांगी संस्कारांची जशी ओळख पटते तशी त्यांच्या उपजत मनोवृत्तीचीही ओळख पटते.

लहानपणी त्यांचे खेळगडी सर्व थरांतील असत. आपल्या महारमित्राला विहिरीवर पाणी पिण्यास नकार मिळताच त्यांनी त्या विहिरीचा रहाटच मोडून टाकला होता.

कोल्हापूरला शिकत असताना मिस क्लार्क यांचे नाव दिलेल्या अस्पृश्य मुलांच्या वसतिगृहाच्या उद्घाटनाला (इ.स. १९०७) ते आवर्जून उपस्थित राहिले. तेथून आल्यावर जैन वसतिगृहाच्या नियमाप्रमाणे पुन्हा अंघोळ करून शुद्ध होण्याचे त्यांनी नाकारले. त्यानिमित्ताने विकोपाला गेलेल्या झगड्यात त्यांनी वसतिगृह सोडले, पण भेदभाव करणाऱ्या नियमांना मान्यता दिली नाही.

इस्लामपूरला शाळेच्या वर्गाबाहेर वसून शिकणारा महार मुलगा दिसला तेव्हा भाऊरावांनी शिक्षकाशी वाद घातला. या मुलाला आपल्या घरी नेऊन जेऊ घातले आणि त्यावद्दल आईच्या हातून फुंकणीचा मार खाल्ला. स्वतः विद्यार्थी असताना या मुलाच्या शिक्षणाचा भार त्यांनी उचलला. जेथे त्याला माणूस म्हणून सन्मानाने शिकता येईल अशा ठिकाणी त्यांनी त्याची व्यवस्था केली. ते साल होते १९०७. हे ज्ञानदेव ध्रुवनाथ घोलप हेच खऱ्या अर्थाने भाऊरावांचे पहिले विद्यार्थी म्हणावे लागतील. पुढे ते पदवीधर झाले. काही काळ 'साप्ताहिक मूकनायक'चे संपादक म्हणून त्यांनी काम केले. सरकारने त्यांची विधानपरिषदेवर आमदार म्हणून नियुक्ती केली. हा मान मिळविणारे मागासवर्गीय समाजातील ते पहिले कार्यकर्ते होते. त्यांनी सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचे विल मांडले. भाऊरावांचा वारसा त्यांनी चालविला.

इ.स. १९०९ ची दूधगावची "शिक्षणप्रसारक संस्था" ही रयत शिक्षण संस्थेची बीजरुप अवस्था होती. सर्व जातिधर्माच्या मुलांची राहण्याची सोय करून शालोपयोगी साहित्य पुरविण्याची ही कल्पना होती. या प्रयोगातही इतर विद्यार्थ्यांबरोबर अस्पृश्य, मुसलमान असे विद्यार्थीही सहभागी होते.

इ.स. १९१२-१४ मध्ये सातारला खाजगी शिकवण्या करताना भाऊराव मांगवाड्यात जाऊन शिकवीत. शिवाशिव पाळीत नसत. शिकविण्याचे पैसे घेत नसत. पदरखर्चाने मुलांना शालोपयोगी साहित्य देत. तेथील दलितांच्या मनात त्यांच्याविषयी आदरबुद्धी आणि आपुलकी रुजली. डांवर प्रकरणात संस्थानी अधिकाऱ्यांनी गणपत मांगासारख्या सराईत गुन्हेगारांकडून भाऊरावांना अडकविण्याचा प्रयत्न झाला. पण भाऊरावांना पाहताच "पाटील मास्तर" असं म्हणून त्याने त्यांचे पाय धरले आणि त्यांच्या विरुद्ध काहीही करण्याचे नाकारले.

किर्लोस्करवाडीच्या कारखान्यातही स्पृश्यास्पृश्य भेद पाळला जात नसे. ओगले, किर्लोस्कर व कूपर या उद्योगपतींकडे काम करीत असताना (इ.स. १९१६ ते १९२२) भाऊरावांनी आग्रह धरला तो कामगारांच्या आणि मजुरांच्या मुलांच्या शिक्षणाचा.[६२]

याच काळात (इ.स. १९१६ - १९२४) भाऊरावांनी सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीत उडी घेतली. सत्यशोधकी जलशातर्फे त्यांनी तुफानी प्रचार केला. परळी, सज्जनगड, औदुंबर येथे देवाचा प्रसाद सर्व जातीपातीच्या लोकांना एकाच पंगतीतून मिळावा यासाठी त्यांनी आक्रमक पवित्रा (इ.स. १९२०) घेतला.

हळूहळू शिक्षणाशिवाय मागासलेल्या जातींना तरणोपाय नाही, ही त्यांची जाणीव दृढ होत गेली. त्यातूनच इ.स. १९१९ मध्ये काले (ता. कराड, जि. सातारा) येथे "रयत शिक्षण संस्थे"चा जन्म झाला तो सत्यशोधक समाजाच्या अधिवेशनात. शिक्षण सार्वत्रिक, सक्तीचे, शक्यतो मोफत – निदान स्वस्त – असले पाहिजे ही अण्णांची भूमिका तशी सत्यशोधकाचीच भूमिका होती. मागासलेल्या वर्गातील विद्यार्थ्यांमध्ये परस्परांविषयी प्रेमभाव वाढविणे आणि त्यांच्यामध्ये शिक्षणविषयक अभिरुची उत्पन्न करणे ही संस्थेची उद्दिष्टे अस्पृश्यतानिवारणाच्या संदर्भात महत्त्वाची आहेत.

इ.स. १९२१ मध्ये संस्थेतर्फे नेर्ले (ता. वाळवा) येथे एक वसतिगृह काढण्यात आले. घरी दळायला बसल्यावर दळणातील मूठभर पीठ या वसतिगृह मुलांसाठी एका पिशवीत काढावे, अशी मुष्टिफंडाची अभिनव कल्पना काढून भाऊरावांनी नव्या जाणिवा माजघरापर्यंत पोहोचविल्या.

नाना प्रकारची वळणेवळसे घेत कर्मवीरांचा जीवनप्रवाह १९२४ च्या आसपास सातारला स्थिरावला. आता सगळ्या व्यवधानातून त्यांनी आपले लक्ष काढले आणि गंभीरपणे


अनुक्रमणिका

शिक्षणावर केंद्रित केले. त्यामुळे आता रयत शिक्षण संस्थेचे केंद्र नेर्ल्याहून सातारला आले. १९२४ मध्ये मोहिते नावाच्या अस्पृश्य मुलाला वसतिगृहात प्रवेश देऊन भाऊरावांनी आपल्या शिक्षणकार्यास पुन्हा एकदा जोमाने सुरुवात केली. इ.स. १९२७ मध्ये सर्व जातिधर्माच्या विद्यार्थ्यांच्या या वसतिगृहाचे नामकरण "श्री छत्रपती शाहू बोर्डिंग हाऊस" असे करण्यात आले – तेही महात्माजींच्या हस्ते. या वसतिगृहात त्यांनी जी जीवनपद्धती रुजविली ती मूलगामी, क्रांतिकारक आणि परिवर्तनाला चालना देणारी होती. तिचा परिचय पुढे ओघाओघात स्वतंत्रपणे करून घेऊ.

सवर्ण हिंदु आणि हरिजन यामध्ये एकता प्रस्थापित व्हावी म्हणून गांधीजींनी उपोषण केले. या उपोषणाचा गौरव करण्यासाठी आणि त्याची स्मृती जागविण्यासाठी कर्मवीरांनी १९३२ मध्ये पुण्याला महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी "युनियन वोर्डिंग हाऊस" काढले. महात्मा गांधी व डॉ. आंबेडकर यांच्यातील दिलजमाईची आठवणही त्यामागे आहे. हे वसतिगृह सातारच्या वसतिगृहाप्रमाणे चालविले जाई आणि त्यातही अस्पृश्य विद्यार्थ्यांचे प्रमाण भरपूर असे.

सातारा येथील बालकमंदिरासाठी मांगवाड्यातून, महारवाड्यातून मुलांना शाळेच्या छकड्यातून आणण्याची व परत घरी पोहोचविण्याची व्यवस्था होती. या व्यवस्थेसाठी आणि शिक्षणासाठी पालकांना कोणताही खर्च करावा लागत नसे.[६३]

महाबळेश्वराच्या दुर्गम परिसरात सर्वोदय केंद्र किंवा शासन यांच्या आधी रयत शिक्षण संस्थेच्या शाळा पोहोचल्या. अस्पृश्यता नाहीशी व्हावी म्हणून या शाळा हेतूपूर्वक देवळात भरविल्या जात. लहानपणापासून अस्पृश्यता नष्ट करण्याचे बीज या पवित्र मंदिरात रोवले जात होते.[६४]

लोकशिक्षणाकडे कर्मवीरांचे लक्ष होतेच. पलूस येथील सहभोजनाला ते उपस्थित होते. पाटण तालुक्यातील तारळे येथे १ मार्च १९५६ रोजी भरलेल्या मेळाव्यात सवर्ण आणि अस्पृश्य मिळून पंधराशे गावकऱ्यांनी सहभोजन केले. या मेळाव्याचे अध्यक्षस्थान कर्मवीरांनी स्वीकारले होते.[६५] मनोरंजनपर कार्यक्रम आणि उद्‌बोधनपर व्याख्याने आयोजित करणारी संस्कारकेंद्रेही संस्थेने गावोगावी चालविली होती.[६६] त्यातही अस्पृश्यतानिवारणावर भर दिला जात असे.[६७]

१९३५ मध्ये रयत शिक्षणसंस्था रजिस्टर झाली आणि प्राथमिक शिक्षकांसाठी ट्रेनिंग कॉलेज सुरू झाले. १९३६ मध्ये संस्थेने पहिली मराठी शाळा काढली आणि लवकरच डोंगराळ व दुष्काळी भागात तिने ५७८ शाळांचे जाळे विणले. १९४० मध्ये मोफत व वसतिगृहयुक्त माध्यमिक शाळा सुरू झाली. १९४७ मध्ये संस्थेचे पहिले मोफत व वसतिगृहयुक्त महाविद्यालय निघाले. अशा अनेक आघाड्यांवर आपल्या अशा अग्रक्रमाने कर्मवीरांनी शिक्षणप्रसाराला गती दिली.

१९४२ मध्ये सौ. लक्ष्मीवाई भाऊराव पाटील यांच्या नावाने मुलींच्या साठी मिश्र वसतिगृह काढण्यात आले. स्त्रीशिक्षिकांसाठी अध्यापिका विद्यालय सुरू करण्यात आले. प्रशिक्षण महाविद्यालयाने या उपक्रमाला पूर्णता दिली.

दलित मुलांमध्ये साक्षरतेचे प्रमाण वाढलेले असले तरी दलित मुलींच्या मध्ये मात्र ते तितकेसे नाही, हे कर्मवीरांना जाणवत होते. मुलींच्या शिक्षणाच्या सोयी तितक्या प्रमाणात उपलब्ध नाहीत असे त्यांना वाटत होते.[६८] त्यामुळे डॉक्टर वावासाहेव आंवेडकर यांच्या मातोश्री भीमावाई आंवेडकर यांच्या नावाने एक कन्याशाळा काढण्याचा संकल्प त्यांनी सोडला आणि संस्थेने तो तडीस नेला.

या संदर्भात आणखी एक वाव नोंदविण्यासारखी आहे. अस्पृश्यतानिर्मूलनाच्या चळवळीतील खंद्या कार्यकर्त्यांच्या प्रेरक स्मृती विद्यार्थ्यांसमोर सतत राहाव्या म्हणून कर्मवीरांनी आपल्या संस्थेच्या निरनिराळ्या शाखांना त्यांची नावे दिलेली आहेत. महात्मा फुले, महात्मा गांधी, राजर्षी छत्रपती शाहू, कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे, ठक्करवाप्पा, श्रीसंत गाडगेमहाराज, डॉ. वावासाहेव आंवेडकर, भीमावाई आंवेडकर अशा नावांनी रयत शिक्षण संस्थेच्या काही शाखा अंकित झालेल्या आहेत. त्यातून कर्मवीरांची तत्त्वनिष्ठा, वांधिलकी आणि सामाजिक कृतज्ञतेची जाणीव व्यक्त होते.

अस्पृश्यतानिवारणासाठी रयत शिक्षण संस्थेच्या माध्यमातून तर कर्मवीरांनी काम केलेच पण इतरही माध्यमांतून त्यांनी काम केले. अस्पृश्यतानिवारण आणि जातिभेदनिर्मूलन यांच्याशी संबंधित अशा संस्था-समित्यांशी त्यांचा घनिष्ट संवंध होता. डिप्रेस्ड क्लास मिशन सोसायटी, मुंवई (विश्वस्त), हरिजन सेवक संघ, मुंवई राज्य, श्री गाडगेमहाराज सेवा संघ, संत चोखामेळा धर्मशाळा, पंढरपूर (विश्वस्त), सातारा जिल्हा वॅकवर्ड क्लास वेलफेअर वोर्ड, मुंवई राज्य, महाराष्ट्र सामाजिक परिषद अशा सर्व ठिकाणी त्यांचे मार्गदर्शन लाभे आणि सहकार्य

असे. शासकीय आणि सामाजिक संस्था-उपक्रमात त्यांचा सारखाच पुढाकार असे. क्रियाशील सहभाग असे.

**परिवर्तनाभिमुख जीवनशैली**

कर्मवीरांच्या अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याचे मर्म त्यांनी आपल्या वसतिगृहातून रुजविलेल्या जीवनपद्धतीत आहे.

कोणतीही सामाजिक चळवळ सहजगत्या घडून येत नाही. ती हेतुपूर्वक घडवावी लागते. तिच्यामागे ठळकपणे लक्षात यावा असा सामाजिक वर्तनाचा आकृतिबंध असतो. समाजामध्ये विशिष्ट बदल घडवून आणण्यासाठी सामूहिक प्रयत्नांच्या स्वरूपात तो आकृतिबंध प्रकट होत असतो. सामाजिक चळवळ ही एक प्रक्रिया असते. या प्रक्रियेतून सामाजिक वर्तन, माणसामाणसांचे आंतरसंबंध आणि मूल्यांची व्यवस्था यांचे नवे रचनाबंध समाजासमोर ठेवले जातात. अशा चळवळींना दोन अंगे असतात. एका पातळीवर त्या मूल्यव्यवस्थेत बदल घडवून आणतात. जुन्या मूल्यांऐवजी नव्या मूल्यांना समाजात सुप्रतिष्ठित करतात. दुसऱ्या पातळीवर या नव्या मूल्यांच्या अनुरोधाने मानवी संबंधांची पुनर्रचना करण्याचा प्रयत्न तीत असतो.

परंपरागत भेदप्रधान समाजरचना बदलून मनुष्याला केंद्र करणारी समताप्रधान समाजरचना आणावी असा कर्मवीरांचा ध्यास होता. त्या नव्या व्यवस्थेचा एक नमुना त्यांनी आपल्या वसतिगृहांमध्ये उभा करून दाखविला.

हा सगळा वृत्तांत रोचक, उद्‌बोधक आणि रोमांचक आहे. १९२४ मध्ये मोहिते नावाच्या अस्पृश्य मुलाला वसतिगृहात प्रवेश देऊन भाऊरावांनी आपल्या कामास सुरुवात केली. जोडीला धाकटा भाऊ बंडू याचेही नाव त्यांनी दाखल केले. सौ. लक्ष्मीबाई पाटील तथा वहिनी परंपरागत धार्मिक जीवनपद्धतीत वाढलेल्या होत्या. भाऊरावांचे हे जातिभेदातीत वागणे आरंभी त्यांना मानवणारे नव्हते. या दोन मुलांसह भाऊरावांनाही त्या घराच्या पडवीत जेवायला बसवीत. हळूहळू त्या भाऊरावांच्या कार्याशी इतक्या समरस झाल्या की नाना जातिपातींच्या मुलांच्या माऊली बनल्या. अगदी मंगळसूत्रापर्यंतचे दागिने या मुलांसाठी मोडायला त्यांनी मागेपुढे पाहिले नाही. भाऊरावांच्या त्या खऱ्या अर्थाने सहधर्मचारिणी बनल्या.

हळूहळू विद्यार्थ्यांची संख्या वाढत गेली. ल.बा. भिंगारदिव्यांसारखे मातंग आणि अप्पालाल शेखांसारखे मुस्लिम विद्यार्थीही त्यात होते. ह्या निरनिराळ्या जातिधर्माच्या विद्यार्थ्यांची एकत्र राहण्याची सोय होऊ शकत होती. पण त्यांच्या एकत्र जेवणाची सोय खानावळीतून होऊ शकत नव्हती. एका खानावळीत मराठा विद्यार्थ्यांना माजघरात, इतरांना सोप्यात आणि अस्पृश्यांना अंगणात जेवण दिले जाई. ही त्या काळाची रीतच होती. अशा तऱ्हेच्या जातवार पंगती इतर वसतिगृहांत आणि शासकीय वसतिगृहांतही होत. ही सगळीच व्यवस्था भाऊरावांना अमान्य होती. त्यातून तोडगा निघाला स्वावलंबनाचा. मुलांनी स्वतःचे जेवण स्वतःच तयार करायला सुरुवात केली. त्यामुळे खानावळीचा खर्च कमी झाला. सगळ्यांना एकाच पंक्तीचा लाभ मिळाला. समतेचे बाळकडू मिळालेल्या या विद्यार्थांनी आपापल्या शाळेच्या स्नेहसंमेलनात जातवार पंगतीऐवजी एकाच पंगतीचा आग्रह धरला.

वसतिगृह चालविण्याचा हा उपक्रम निश्चितच खर्चिक होता. तीनशे रुपये उत्पन्नाची आपली कूपर कारखान्याची नोकरी भाऊरावांनी सोडून दिली होती. सगळा वेळ या मुलांच्या शिक्षणासाठी दिला पाहिजे, असे त्यांना वाटे. भविष्यकाळाचा विचार न करता ते आपल्या जवळचा पैसा खर्च करीत. पंधराशे रुपयांची रोख शिल्लक, एक हजार रुपयांचे किर्लोस्कर कंपनीचे शेअर्स, सौ. लक्ष्मीबाई पाटील यांच्या अंगावरील मंगळसूत्रासह नव्वद तोळ्यांचे दागिने असे सारे या वाढत्या खर्चाला पुरे पडेनात. एखाद्या मित्राकडून कधीमधी धान्याची पोती येत, एवढीच काय ती मदत असे. १९२४ ते १९२७ या काळात वसतिगृहाला मिळालेली रोख मदत १६३ रुपयांची होती.[६९] या संपूर्ण कामाविषयी समाजात केवढी अनास्था होती, याची ती साक्ष होती. अशा अडचणीतून मार्ग काढण्यासाठी 'कमवा आणि शिका' किंवा स्वावलंबी शिक्षण योजना ही क्रांतिकारी कल्पना अर्धस्फुट रुपात हळूहळू साकार होत गेली.

सातारा येथील जलमंदिराच्या मागे राणीसाहेबांची राजस्त्रियांच्या विहाराची बाग होती. ही "धनिणीची बाग" कर्मवीरांनी छत्रपतींच्या कारभाऱ्याकडून वार्षिक ६५० रुपये खंडाने घेतली. तिच्या जवळची "काकडे बाग"ही घेतली. राहण्यासाठी फरासखान्याजवळच्या मोठ्या दुमजली वाड्याचा काही भाग महिना पंधरा रुपये भाड्याने घेतला. या जागेत सगळे विद्यार्थी एकत्र राहू लागले आणि त्यांना काही काम देण्याची सोयही झाली.

असे काही प्रश्न सुटत चालले तरी अडचणी आणि

उपेक्षा कमी होत नव्हती. अस्पृश्य मुलांच्या सहवासामुळे सगळ्या वसतिगृहालाच अस्पृश्य मानले जाई. अगदी सौ. लक्ष्मीवाईंशीही पेठेतील स्त्रिया फटकून वागत. हळदीकुंकू, सणवार असे त्यावेळी त्यांना निमंत्रण देण्याचे टाळीत. सार्वजनिक हौदावर अंघोळीस जाणाऱ्या विद्यार्थ्यांना हुसकून लावले जाई. सार्वजनिक संडासातही येऊ देत नसत. जात सांगितल्याशिवाय त्यांना हॉटेलमध्ये प्रवेश मिळत नसे. त्यांचे केस कापण्यासही नकार मिळे. अशा वेळी मुलांनीच एकमेकांचे केस कापायला सुरुवात केली. कधी शांततेने तर कधी संघर्षाचा पवित्रा घेऊन पण नेहमीच सोशिक चिकाटीने ही मुले या साऱ्या अडचणींचा प्रतिकार करीत. ही खेड्यापाड्यांतील कष्टाळू मुले शरिराने दणकट आणि मनाने कणखर असत. त्यांच्या गरजा थोड्या असत. ते अडचणींच्या परिस्थितीतही सोशिकपणे राहत आणि वेळ निभावून नेत.

कोणत्याही कामासाठी या वसतिगृहात पगारी नोकर नव्हता. पहाटे ४.३० ते रात्री १०.३० या वेळात अभ्यास, काम, खेळ आणि व्यायाम यांची काटेकोर दैनंदिनी ठरलेली असे. आजारी विद्यार्थ्यांशिवाय कोणालाही कामात सवलत नसे. बारा मुले पूर्णपणे मोफत राहत. बारा जणांचा खर्च शिष्यवृत्त्यांमधून भागवला जाई. दहा मुले आपल्या खर्चाचा भार पुष्कळ प्रमाणात स्वतः उचलीत. पण त्यांना मिळणाऱ्या वागणुकीत कोणताही फरक केला जात नसे. सगळे विद्यार्थी खांद्याला खांदा लावून काम करीत. त्यामुळे गरीब व इतर मुले यांत भेद जाणवत नसे. गणवेश असल्याने आणखी समरुपता येई.

जमाखर्च लिहिणे, कोठी सांभाळणे, स्वयंपाक करणे, शेतीकाम करणे, जनावरांच्या धारा काढणे, दूध विरजणे, फळे व भाजी मंडईत नेऊन विकणे अशी कामे योग्य विद्यार्थ्यांवर सोपविलेली असत. त्यामुळे मुलांना जबाबदारीने व स्वावलंबनाने काम करण्याची सवय लागे. विद्यार्थ्यांचे कामासाठी गट केले जात. त्यांच्यात काम कसोशीने व चोखपणे करण्याची निरोगी स्पर्धा असे.

स्वच्छता, वक्तशीरपणा अशा चांगल्या सवयी त्यांना कटाक्षाने लावल्या जात. साधेपणा तर परिस्थितीनेच आलेला असे.

मुलांच्या अभ्यासाकडे कर्मवीरांचे बारकाईने लक्ष असे. त्यासाठी ते शाळांशी व शिक्षकांशी संपर्क ठेवून असत. वरच्या वर्गातील विद्यार्थी खालच्या वर्गातील मुलांना अभ्यासात मदत करीत. ही मुले चांगल्या तऱ्हेने यश मिळवीत. ल.व. भिंगारदिवे हा मातंग मुलगा संस्कृतमध्ये पहिला आला. म्हणून महात्माजींनी आपल्या गळ्यातील पुष्पहार त्याच्या गळ्यात घातला होता. याच भिंगारदिव्यांना बी.ए.च्या वर्गात अडचणी येऊ लागल्या म्हणून कर्मवीरांनी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोश्यांसारख्या प्रकांड पंडिताला गळ घालून त्यांचा अभ्यास घ्यायला लावला होता. हे भिंगारदिवे पुढे नामवंत विधिज्ञ झाले. १९५२ मध्ये काँग्रेसतर्फे आमदार म्हणून निवडून आले. रामभाऊ नलावडे हे महार विद्यार्थी स्वतंत्र भारताच्या घटनासमितीचे सभासद होते. संस्थेच्या कामात कर्मवीरांना त्यांनी साथ दिली आणि कर्मवीरांच्या नंतरही आजीवन संस्थेची धुरा सांभाळली. एम.आर. वोवडे हे चांभार विद्यार्थी परदेशी जाऊन उच्चशिक्षित झाले आणि डेप्युटी एज्युकेशन इन्स्पेक्टर म्हणून त्यांनी चांगले काम केले. सेवानिवृत्तीनंतर त्यांनी काही काळ संस्थेत अध्यापनही केले. अशा कितीतरी विद्यार्थ्यांच्या कर्तृत्वाचा पाया याच वसतिगृहात घातला गेला.

२५ फेब्रुवारी १९२७ला महात्मा गांधींनी "श्री छत्रपती शाहू वोर्डिंग हाऊस" असे या वसतिगृहाचे नामकरण केले. "जे मला सावरमतीच्या आश्रमात करता आले नाही ते तुम्ही येथे केले" अशी त्यांनी भाऊरावांच्या पाठीवर शावासकीची थाप दिली.

१९२८ला हे वसतिगृह पाहून डॉ. वावासाहेब आंवेडकर हरखून गेले. "ही अशी एकमेव संस्था आहे की, राष्ट्रकल्याणाची काळजी वाहणाऱ्या प्रत्येक माणसाने तिच्या उत्कर्षाला हातभार लावावा." असा मनमोकळा शेरा वीस रुपायांच्या देणगीसह त्यांनी दिला होता. स्वतंत्र फराळाचे नाकारून मुलांच्या पंगतीला बसून जेवणेच त्यांनी पसंत केले.

४ एप्रिल १९३३ ला वडोदानरेश महाराजा सयाजीराव गायकवाड यांनी जेव्हा या वसतिगृहाला भेट दिली तेव्हा मुलांनी तयार केलेले पिठलं-भाकरी खाऊन पाहण्याचा मोह त्यांनाही आवरला नाही. त्या झणझणीत तिखटाने तोंड भाजल्यावर 'फिल्टर्ड' पाण्याचा शोध सुरू झाला. तेव्हा भाऊरावांचा विद्यार्थी नारळीच्या झाडावर चढला आणि शहाळ्याच्या गोड पाण्याने त्याने महाराजांची तहान भागविली.

१९२७ला वसतिगृहातील विद्यार्थांची संख्या होती चौतीस. त्यांपैकी १३ मराठे, ११ महार, १ मांग, १ रामोशी,

अनुक्रमणिका

२ मुसलमान आणि वडार, न्हावी, परीट, जैन, लिंगायत, ब्राह्मण प्रत्येकी एक-एक अशी त्यांची जातवार वर्गवारी होती. अशा तऱ्हेचे हे पहिलेच वसतिगृह म्हणावे लागते. यापूर्वी छत्रपती शाहूमहाराजांनी निरनिराळ्या जातीच्या विद्यार्थ्यांसाठी वेगवेगळी वसतिगृहे काढली होती. महर्षी कर्वे यांच्या पुण्याच्या महिला वसतिगृहात ब्राह्मणेतर स्त्रियांना लवकर प्रवेश मिळाल नाही आणि जेव्हा मिळाला तेव्हा त्यांना स्वयंपाक करू दिला गेला नाही. डॉक्टर बाबासाहेब आंबेडकरांच्या वसतिगृहातून केवळ मागासजातीच्या विद्यार्थ्यांनाच प्रवेश दिला जाई. तेव्हा सर्व जातिधर्माच्या मुलांच्या एकत्र वसतिगृहाचा प्रयोग करून कर्मवीरांनी सर्वांच्या पुढे पाऊल टाकले, असे निःशंकपणे म्हटले पाहिजे.

महाराजा सयाजीराव गायकवाडांसमोर आपल्या वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या जीवनसरणीचे कर्मवीरांनी जे वर्णन केले आहे ते असे – "या संस्थेमध्ये हल्ली शंभर मुले आहेत. त्यांपैकी पन्नास अस्पृश्य व बाकी स्पृश्य आहेत. दरेक मुलास मासिक खर्च पाच रुपये येतो. त्यापैकी स्वतःच्या कष्टाने दरेकजण दीड रुपया कमवितो. व निव्वळ बाकी खर्च फक्त साडेतीन रुपये येतो. दरेक विद्यार्थी आळीपाळीने भांडी घासणे, स्वयंपाक करणे, शेण काढणे, झाडलोट करणे, बागेमध्ये काम करणे इत्यादी कामे करतो. ही कामे करवून घेण्याचा हेतू हा आहे की, अशा प्रकारची कामे करणे हे हीनपणाचे न समजता (मुलांनी त्यांना) सन्माननीय समजले पाहिजे व तो ठसा मनावर उमटून दरेकास 'डिग्निटी ऑफ लेबर' बरोबर समजावी हा होय. आठ महिने सर्व मुले आम्रवृक्षाच्या छायेखालीच निजणे-बसणे करतात. म्हणजे उघड्या हवेमध्येच राहतात व पावसाळ्याचे फक्त चार महिनेच येथे असलेल्या झोपड्यांचा आश्रय घेतात. येथील महार वगैरे पुष्कळ विद्यार्थ्यांनी निरनिराळ्या शिक्षणसंस्थांमध्ये संस्कृतसारख्या गहन विषयांमध्येदेखील पारितोषिके पटकाविली आहेत, हे सांगण्यात मला अभिमान वाटतो. ह्यावरून काय सिद्ध होते तर हे की, ह्या हीन मानलेल्या लोकांना जर संधी मिळाली तर ते इतर पांढरपेशा लोकांपेक्षा कोणत्याही दृष्टीने कमी नाहीत, हे होय. येथे आम्ही विद्यार्थ्यांस स्वाभिमानी होण्यास शिकवितो. आम्ही याचना करीत नाही व त्यांना याचना करण्यास शिकवीत नाही. दान देण्यास हात वर ठेवा, पण ते घेण्यास हात पसरू नका, असे आम्ही त्यांना सांगतो. आणि म्हणूनच कष्ट सोसण्यास ते उद्युक्त होतात. ह्या संस्थेतून ते स्वाभिमानी, कार्यक्षम व उदारमतवादी नागरिक बनून बाहेर पडतील, असे ध्येय आम्ही ठेविले आहे."[७०]

या निवेदनातून कर्मवीरांची शिक्षणदृष्टी स्पष्ट झाली आहे. ज्ञानाला स्वतंत्र आणि निरपेक्ष असे स्वयंभू मूल्य आहे. या अर्थाने शिक्षण हे साध्य आहे. या शिक्षणाने व्यक्तीच्या अंगभूत गुणांचा विकास होतो आणि तिच्या व्यक्तिमत्त्वाला पूर्णता येते. योग्यायोग्यतेचा विवेक अंगी बाणतो. परिवर्तनाच्या दिशा दृष्टिपथात येतात. या अर्थाने शिक्षण व्यक्तिगत विकासाचे आणि सामाजिक परिवर्तनाचे प्रभावी साधन ठरू शकते. कर्मवीरांनी शिक्षणाला एकाच वेळी साधन मानले आणि साध्यही बनविले.

आपला विद्यार्थी ज्ञानाभिलाषी व स्वावलंबी असावा. चारित्र्यसंपन्न असावा. अस्पृश्यतेसारख्या रूढी नाकारणारा, गरीब-श्रीमंत किंवा जात, गोत, पंथ, धर्म असे भेद न मानणारा आणि सर्वांशी बंधुभावाने वागणारा असावा, असे त्यांना अपेक्षित होते. त्या अनुरोधाने त्यांनी वसतिगृहातील जीवनसरणी आखली होती. एका बाजूला गरजा आणि दुसऱ्या बाजूला उद्दिष्टे यांनी तिला आकार दिला. परिश्रमाने होणारा शरीरविकास आणि अभ्यासाने होणारा मनोविकास यांचा सांधा या पद्धतीत जोडला गेला. मन, मेंदू आणि मनगट यांच्या संवादी विकासावर भर देणारी ही व्यवस्था होती. जातीपातींची जळमटे दूर करण्याचे सामर्थ्य तीत होते. विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत विकासाबरोबर सामाजिक जाणिवा रुजविण्याचा प्रयत्न तीत होता.

"जातीची कीड समूळ नाहीशी करणारी व्यवस्था" अशा शब्दांत या जीवनपद्धतीचा महाराजा सयाजीरावांनी गौरव केला आहे, तो अत्यंत सार्थ वाटतो. "....Such hostels had a far-reaching influence in eradicating untouchability."[७१] अशी कर्मवीरांच्या वसतिगृहांची नोंद शासनदरबारी आवर्जून घेतली गेली.

शेवटी जातिभेद मोडतो तो कोणत्याही एका जातीने दुसऱ्या जातीचा द्वेष करून मोडत नाही. एका जातीची सत्ता दुसऱ्या जातीच्या हाती आल्याने जातिभेद मोडत नाही. वर्चस्वभावना जेव्हा नाहीशी होते, माणसातल्या एकत्वाची अंतःकरणाला प्रतीती येते, समतेची भावना रुजते तेव्हा जातिभेद नाहीसा होतो. त्यासाठी सगळ्यांनाच जातिनिरपेक्ष जीवन जगण्याची संधी उपलब्ध करून द्यावी लागते. प्राचीन गुरूकुलांचे

पुनरुज्जीवनच नव्हे तर आधुनिकीकरण करून कर्मवीरांनी तशी संधी उपलब्ध करून दिली. उपेक्षित आणि दलित विद्यार्थ्यांना त्यांनी हात दिला. त्यातून त्यांच्या वैयक्तिक जीवनात परिवर्तन झाले. त्याचबरोबर सामाजिक बदलाचे नवे वारेही वाहू लागले.

कर्मवीरांच्या या मूलगामी आणि क्रांतिकारी तत्त्वप्रणालीचा गौरव करताना जयप्रकाश नारायण यांनी म्हटले होते – "शिक्षणक्षेत्रमें यह समाजवादी सिद्धांतोंका व्यावहारिक प्रयोग देखकर मैं केवल खुशही नही बल्कि मुझे एक नयी दृष्टी मिली। श्री. भाऊराव पाटील साहबने अपने महत्त्वपूर्ण कार्यसे पूरे राष्ट्रको एक नया पथ दिखाया है।"[७२]

**अस्पृश्यतानिवारणकार्याचा व्याप आणि विस्तार**

अस्पृश्यतानिवारणाचे आणि जातिभेद निर्मूलनाचे कर्मवीरांचे कार्य जसे मौलिक आणि मूलभूत स्वरुपाचे होते त्याचप्रमाणे त्याचा विस्तार आणि व्यापही फार मोठा होता. एका अस्पृश्य विद्यार्थ्यासह कर्मवीरांनी व्यक्ती म्हणून आपल्या कामाला सुरुवात केली ती १९०७ मध्ये. सातारला रयत शिक्षण संस्थेचे केंद्र आले तेव्हाही त्यांच्याबरोबर एकच अस्पृश्य विद्यार्थी होता. तेव्हापासून रयत शिक्षण संस्थेत अस्पृश्य विद्यार्थ्यांची संख्या नेहमीच जास्त राहिली आहे. १९२७ मध्ये ३४ विद्यार्थ्यांपैकी १३ विद्यार्थी दलित होते. १९३३ मध्ये १०० पैकी ५० विद्यार्थी दलित होते. १९३६-३७ मध्ये सातारला एकूण १६४ पैकी ७२ आणि पुण्याला २० पैकी ९ अशी दलित विद्यार्थ्यांची संख्या होती. १९३५ ते १९३८ च्या पहिल्या त्रैवार्षिक अहवालानुसार छ. शाहू बोर्डिंग हाऊसमध्ये एकूण १८८ विद्यार्थी होते. २ ब्राह्मण, ६ जैन, १३ मुसलमान, ६० मराठा, २९ इतर मागास, ३९ महार, १६ मांग, १५ चांभार, ५ रामोशी, २ ढोर, १ भटक्या जमातीचा अशी त्यांची जातवार वर्गवारी होती. १९५७ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या महाड येथील महाविद्यालयात एकूण १५० विद्यार्थ्यांपैकी ७ विद्यार्थी दलित होते, तर कर्मवीरांच्या सातारा येथील महाविद्यालयात एकूण ५०० विद्यार्थ्यांपैकी १७५ विद्यार्थी अस्पृश्य होते. १९३९ पासून कोर्ट-कमिटेड व अनाथ मुलेही या ज्ञानयज्ञात सहभागी झाली. १९४२ मध्ये मुलांप्रमाणेच मुलींसाठीही मिश्र वसतिगृह निघाले. खानदेशापासून गोव्यापर्यंतचे आणि कोकणापासून मराठवाड्यापर्यंतचे विद्यार्थी येथे शिक्षण घेत.

आज अमृतमहोत्सवी वर्षामध्ये (१९९५-९६) महाराष्ट्राच्या पंधरा जिल्ह्यांत आणि कर्नाटकाच्या एका जिल्ह्यात संस्थेचा व्याप-विस्तार पसरलेला आहे.

पूर्व प्राथमिक (४२), प्राथमिक (२४) आणि माध्यमिक (४२७) विद्यालये, अध्यापक विद्यालये (८), महाविद्यालये (४०), वसतिगृहे (८१), आश्रमशाळा (८), औद्योगिक प्रशिक्षणसंस्था (६), कार्यालये (७) इतर शाखा (५६) अशा ६९९ शाखा संस्थेच्या वतीने चालविल्या जातात. महाराष्ट्राच्या सर्व भागांतून आलेले १७, २१० सेवक संस्थेत काम करतात. त्यांपैकी १०,१४२ बिगर मागासवर्गीय असून ७०६८ मागासवर्गीय सेवक आहेत. या वर्षी २,३६,६९३ विद्यार्थी व १,५५,३६५ विद्यार्थिनी असे मिळून संस्थेत ३,९२,०५८ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. यांपैकी २,३३,६९४ बिगर मागासवर्गीय असून १,५०,३६४ मागासवर्गीय विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. मागासवर्गीयांना ज्ञानी करण्याचे कार्य एवढ्या मोठ्या प्रमाणावर करणारी रयत शिक्षण संस्था ही एकमेव संस्था म्हणावी लागेल.

परिसराच्या दृष्टीने ग्रामीण, आर्थिक दृष्टीने गरीब आणि जातीय दृष्टीने मागासवर्गीय यांच्यासाठी संस्था किती आणि कशी उपयुक्त ठरली, हे या बोलक्या आकड्यांवरून सहजपणे लक्षात यावे. ज्ञानाच्या प्रसाराची आणि त्यातून होणाऱ्या सामाजिक बदलाची एक व्यापक चळवळ रयत शिक्षण संस्थेच्या माध्यमातून उभी राहिली. तिने संथ गतीने पण सातत्याने समाजाचे परिवर्तन घडविले. महाराष्ट्राचा चेहरामोहरा बदलून टाकला.

रयत शिक्षण संस्थेने लाखो दलितांना शिकवून शहाणे केले. सुशिक्षित दलितांची नवी पिढी निर्माण केली. दलित चळवळीला कार्यकर्ते पुरवून बाबासाहेब आंबेडकरांचे हात बळकट केले. अस्पृश्यतानिवारणासाठी लोकांची मने अनुकूल बनविली.

**'भाऊरावीय स्पर्श'**

अस्पृश्यतानिवारणाचे कार्य कर्मवीरांनी मनोभावाने केले. आरंभापासून अखेरपर्यंत अस्पृश्यतानिवारण हा त्यांच्या कार्याचा एक महत्त्वाचा भाग राहिला, हे आतापर्यंतच्या विवेचनावरून स्पष्ट झाले आहे. या कामातील कर्मवीरांचे वेगळेपण, त्यांची काही वैशिष्ट्ये, विचार, कार्यपद्धती यांच्या काही संकीर्ण नोंदी येथे करावयाच्या आहेत.








आपल्या विचार-निष्ठांविषयी इमान वाळगणे हा कर्मवीरांचा वृत्तिधर्म होता. यावावतीतली आचार-विचारातील विसंगती त्यांना खपत नसे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्यासारख्या पुरोगामी विचारवंताने सोरटी सोमनाथाचे पौरोहित्य करावयास जावे, हे त्यांना आवडले नाही. आपली नाराजी त्यांनी आपले स्नेही असलेल्या तर्कतीर्थांजवळ व्यक्त केली. अस्पृश्यांना मंदिरात प्रवेश देणार असल्याचे जाहीर केल्यामुळे कोणीही पंडित येण्यास तयार होईना म्हणून मी गेलो, असा तर्कतीर्थांनी खुलासा केल्यावरच कर्मवीरांचे समाधान झाले.

अस्पृश्यतानिवारण करू पाहणाऱ्या कार्यकर्त्याने आपल्या घरापासून सुरुवात केली पाहिजे, असा त्यांचा कटाक्ष होता. अस्पृश्य मुलाला घरात जेऊ घातले म्हणून फुंकणीने मारणारी कर्मवीरांची आई आयुष्याच्या उत्तरार्धात महारामांगांच्या मुलींकडून आनंदाने पाणी पिऊ लागली. शिवाशिव टाळणाऱ्या त्यांच्या पत्नी सौ. लक्ष्मीवाई या साऱ्या मुलांच्या माउली बनल्या. ही उदाहरणे सांगून कर्मवीर म्हणतात, "पुष्कळ कार्यकर्ते कार्य करण्यास नको म्हणून आपली वायको, आपली बहीण, आपली आई ह्यांची नावे पुढे करून वायकांच्या लुगड्यापाठीमागे दडतात. स्त्रियांनी त्यांना असे दडू देऊ नये."[७३]

१९४४ मध्ये अष्टा येथील शाळेत कर्मवीरांनी आर.व्ही. खैरमोडे नावाच्या तडफदार महार तरुणाची मुख्याध्यापक म्हणून नेमणूक केली. जातीपातीच्या परंपरागत कल्पना मानणाऱ्या गावकऱ्यांना हा मोठाच धक्का होता. त्यांनी हेडमास्तर वदलावा असा हट्ट धरला. त्या वदल्यात शाळेला सर्व प्रकारचे सहकार्य करण्याची तयारी दाखविली. नुसतीच शाळा चालवून संतुष्ट होणाऱ्या शाळासंचालकाने गावकऱ्यांचा हट्ट पुरविला असता. पण केवळ पाठ्यक्रम शिकविणाऱ्या शाळा कर्मवीरांना चालवायच्या नव्हत्या. समाजपरिवर्तनासाठी उद्युक्त करणाऱ्या ज्ञानाचा प्रसार त्यांना करावयाचा होता. म्हणून त्यांनी अस्पृश्यतेवर चर्चा केली नाही, तर गावकऱ्यांच्या दैनंदिन जीवनाच्या प्रवाहातच त्यांनी तो प्रश्न उपस्थित केला. अस्पृश्याकडून ज्ञान घ्यावयाचे की नाही? त्यासाठी गावात आलेली शाळेची सोय नाकारायची का? याचा निर्णय त्यांनी लोकांनाच घ्यायला लावला. प्रत्यक्ष कृती करण्याची दिशा दाखविली. कर्मवीरांचे शिक्षण असे समाजाला प्रवाही आणि गतिमान बनविणारे होते. खैरमोडे यांनीही प्रकृती ठीक नसताना शाळेसाठी जिवापाड कष्ट घेतले. प्लेगच्या साथीतही त्यांनी शाळा वंद ठेवली नाही. गावावाहेर पत्र्याच्या शेड्स उभारून मुलांचा अभ्यास घेतला. मॅट्रिकचा निकाल ९५% लावला. त्यानंतर खैरमोड्यांना दवाखान्यात हलवावे लागले. तेथेच ११ सप्टेंवर १९४६ रोजी त्यांचा दुःखद अंत झाला. "आज संस्थेने दुसरा आंवेडकर गमावला आहे" अशा शब्दात कर्मवीरांनी आपले दुःख व्यक्त केले.

शिक्षकाविषयी कर्मवीरांची काही निश्चित मते होती. खालच्या जातीतील लोकांच्या उन्नतीविषयी वरच्या जातीतील लोक एक तर उदासीन असतात किंवा विरोधी तरी असतात असा कर्मवीरांचा अनुभव होता. इ.स. १८८३ मध्ये महाराजा सयाजीराव गायकवाडांनी काढलेल्या शाळांमध्ये अस्पृश्यांना शिकविण्यासाठी सवर्ण शिक्षक मिळू शकले नाहीत. त्यामुळे त्यांना मुसलमान शिक्षक नेमावे लागले. विद्यार्थ्यांचा आणि त्यांच्या पालकांचा शिक्षणावद्दलचा उत्साह वाढविणे किंवा नाहीसा करणे शिक्षकावर अवलंबून असते. मागास जातींतील मुलांच्या उत्साहावर वोळा फिरविणार नाही असे शिक्षक तयार करायला हवेत, असे डॉ. आंवेडकरांनाही[७४] वाटत होते. "ब्राह्मण शिक्षकापेक्षा वहुजनसमाजातील शिक्षकच आपल्या समाजातील विद्यार्थ्यांच्या शिक्षणावद्दल अधिक आस्थेवाईक आणि जागरूक राहतील, असे डॉ. आंवेडकर यांच्याप्रमाणे भाऊराव पाटील यांचेही मत होते."[७५] त्यामुळे मुलांसाठी माध्यमिक विद्यालय काढण्याच्या आधी त्यांनी प्राथमिक शिक्षक घडविणारे अध्यापक विद्यालय काढले. शिक्षणाच्या अग्रक्रमावावत कर्मवीरांची दृष्टी अशी मूलगामी आणि वैशिष्ट्यपूर्ण होती. तिला समाजवास्तवाच्या निरीक्षणाचा आणि मागासवर्गीयांच्या गरजांचा आधार होता.

'महात्मा फुले अध्यापक विद्यालया'त प्रशिक्षणार्थी विद्यार्थ्यांना कोणत्या सवलती द्याव्यात हे संस्थेचे मानसेवी सचिव श्री. वा.ना. नलावडे यांना त्यांनी कळविले आहे. त्याच पत्रात ते पुढे म्हणतात.... "जात, गोत, धर्म, पंथभेदादी कोणताही भेद न मानणाऱ्या व महात्माजींच्या सत्य, अहिंसा व स्वावलंबन या (तत्त्वांवर) श्रद्धा ठेवून त्याप्रमाणे आचरण करणाऱ्या विद्यार्थ्यांनाच वरील सवलती देण्यात याव्यात."[७६] आडात असल्याशिवाय पोहऱ्यात काही येत नाही, हे त्यांना माहीत होते आणि म्हणूनच नवजाणिवांनी संपन्न असलेल्या शिक्षकांकडूनच नवी मानसिकता विद्यार्थ्यांत रुजावी, याची त्यांनी काळजी घेतली.

कर्मवीरांनी किती लाख मुलांना शिकविले याला निश्चितच

महत्त्व आहे. पण त्याबरोबरच या मुलांनी मोठेपणी कोणती मूल्ये स्वीकारली, जीवनाच्या क्षेत्रात त्यांची जपणूक कशी केली आणि कोणते कर्तृत्व गाजविले यालाही महत्त्व आहे. वरळी येथे सवर्ण आणि दलित यांच्यात दंगली उसळल्या. यात काही सवर्णांनी भाग घेतला नाही. उलट दलितांना संरक्षण दिले. एका अशासकीय समितीने[७७] या दंगलीचे सर्वेक्षण केले. तेव्हा असे लक्षात आले की, ही माणसे सातारा, सांगली, कोल्हापूर जिल्ह्यातील होती. त्यांचे शिक्षण कर्मवीरांच्या रयत शिक्षण संस्थेत झालेले होते. सामाजिक एकात्मतेचे संस्कार आत्मसात केलेल्या या माणसांनी भेदभाव मानले नाहीत. संघर्ष भडकाविला नाही तर मानवतेचा हात पुढे करून दलित बांधवांचे रक्षण केले. कर्मवीरांची मूल्ये अशी त्यांच्या लक्षावधी विद्यार्थ्यांच्या वागण्याबोलण्यातून पाझरत राहिली. समाजमनाचे भरणपोषण करीत राहिली.

अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यात कर्मवीरांनी काही पथ्ये पाळली. मुंबई राज्यातर्फे अस्पृश्यतानिवारणासाठी शासनातर्फे तीन अनुभवी प्रचारकांची मानधनासह नियुक्ती करावयाची होती. बॅकवर्ड क्लास वेलफेअरचे डायरेक्टर श्री. टी.एम. चौधरी यांनी दि. ३१.१२.१९५४ च्या पत्राने कर्मवीरांना तशी विनंती केली. संस्थेचा वाढता व्याप, इतर कामे आणि प्रकृतीचे अस्वास्थ्य यामुळे कर्मवीरांनी हे पद स्वीकारण्यास आभारपूर्वक नकार दिला. त्याच वेळी "माझ्या नेहमीच्या कार्यक्रमात अस्पृश्यता नष्ट करण्याबद्दल मी वारंवार प्रयत्न केला आहे, करीत आहे व येथून पुढे करीत राहणार आहे,"[७८] अशी ग्वाही त्यांनी दिली आहे. आपल्या उद्दिष्टापासून ते कधीच ढळत नसत. फुकटच्या मोठेपणामागे लागत नसत. विनाकारण खुर्ची अडवून बसण्याची त्यांची पद्धती नव्हती.

अस्पृश्यतानिवारण करणारांना शासनाने तीनशे रुपये मानधन देऊ केले होते. ते नाकारताना कर्मवीर म्हणतात, "हिंदुस्थानात सर्व जनतेने एकोप्याने राहावे व मानवता प्रस्थापित व्हावी, यासाठी माझा प्रयत्न सुरुवातीपासूनचा आहे. नव्हे हे कार्य म्हणजे माझा आत्मा आहे. यासाठी मी माझे जीवन समर्पित केले आहे. या कामाबद्दल मला मोबदला मिळावा, अशी मी कधीही अपेक्षा केलेली नाही व करणार नाही. यामुळे मला मानधन स्वीकारता येत नाही, याबद्दल खेद होत आहे."[७९]

**कृतज्ञतेचे पाझर**

अस्पृश्यतानिवारण हा माझा धंदा नाही, धर्म आहे, असे कर्मवीरांनी या संदर्भात म्हटले आहे. हा धर्म त्यांनी निष्ठापूर्वक आजीवन आचरला. त्यांच्या कार्याविषयीचे कौतुक आणि कृतज्ञता समाजाच्या वेगवेगळ्या थरांतून व्यक्त झालेली आहे.

दूरवर राहणाऱ्या आणि कर्मवीरांच्या प्रत्यक्ष संपर्कात फारसे न येणाऱ्यांनाही त्यांच्या कार्याविषयी केवढी कृतज्ञता वाटत होती, हे नगरच्या पंढरीनाथ रा. कानवडे पाटील यांच्या पुढील पत्रावरून स्पष्ट होते. ते म्हणतात, "आपण आम्हा सर्वांस बापासारखे प्रिय आणि पूज्य आहात. आम्ही जरी आपल्याजवळ, आपल्या कार्यात सहकारी नसलो तरी आपल्या तेजात आम्हांस स्फूर्ती व उत्साह मिळतो, अशी आमची नम्र भावना असते."[८०] ह्या बोलक्या शब्दांत असंख्य लोकांची मूक कृतज्ञता व्यक्त झालेली आहे.

कर्मवीरांचे कौतुक धर्मपीठांनीही केले आहे. "....स्पर्शास्पर्शाचा भेद न ठेविता, अहिंसा तत्त्वास अनुसरून, कामगिरी मोठ्या दक्षतेने व स्वार्थत्यागपूर्वक सर्वस्व अर्पण करून मोठ्या मेहनतीने करीत असल्याचे आम्ही ऐकिले... प्रत्यक्ष पाहिले.... यावरून आम्हांस अत्यानंद झाला."[८१] अशी जैन मठपतींनी त्यांची प्रशंसा केली आणि त्यांच्या एकुलत्या एका मुलाच्या शिक्षणाची जबाबदारी उचलण्याची तयारी दाखविली.

'उपेक्षितांच्या अंतरंगा'त डोकावल्याने माणुसकीचा गहिवर दाटून येणारे क्रियाशील कार्यकर्ते आणि विख्यात साहित्यिक श्री. म. माटे यांनी कर्मवीरांना लिहिले आहे –"आपण आपले जीवित सत्कारणी लावले आणि ज्यांना कोणी आपंगिता नाही, त्यांना हाताशी धरून, त्यांच्या सामर्थ्याचा विकास करून, त्यांना कर्त्या लोकांच्या पंक्तीला आणून बसविले आहे, हे पाहून मन खरोखर प्रसन्न होते.... निकृष्ट लोकांसाठी मी थोडाबहुत झगडलो आहे, पण आपल्या मानाने माझे प्रयत्न काहीच नव्हते."[८२]

**संदर्भ आणि टीपा**

१. रयत शिक्षण संस्थेच्या सातारा येथील मध्यवर्ती कार्यालयात कर्मवीरांना आलेली पत्रे आणि त्यांनी इतरांना लिहिलेली पत्रे यांच्या स्थळप्रती, त्यांच्या भाषणांची कात्रणे उपलब्ध आहेत. त्यांपैकी काही निवडक भाग "कर्मयोगी" या कर्मवीर भाऊराव पाटील जन्मशताब्दी अंकात (संपादक, पी.जी. पाटील, आ.भा. मगदूम, एस.डी. पाटील, व्ही.व्ही. पंडित, दीपा महानवर, प्रकाशक – श्री. सुभापचंद्र भोसले, सचिव, रयत शिक्षण संस्था, सातारा, पुणे, १९८९) पृष्ठ १३ ते ९४ वर छापण्यात आला आहे. अशा साधनांचा एक संग्रह मा.भि. काटकर यांनी प्रसिद्ध केला असून त्यांच्या संपादन-प्रकाशनाचे काम एका समितीतर्फे चालू आहे. या दोन्ही संकलनांत समाविष्ट नसलेल्या साधनांचा संभारही मोठा आहे. याशिवाय कर्मवीरांची चरित्रे, त्यांच्यावरील प्रसिद्ध झालेले विचारमंथन, रयत शिक्षण संस्थेचे वार्षिक अहवाल आणि संस्थेतर्फे प्रकाशित झालेले विशेषांक अशी सर्व साधनसामग्री येथे अभिप्रेत आहे. तिचा यथास्थानी उल्लेख पुढे केला आहे. रयत शिक्षण संस्थेचे सचिव प्राचार्य शिवाजीराव भोर यांनी ही सामग्री पाहण्याची संधी मला दिली, यावद्दल मी त्यांचे येथेच अंतःकरणपूर्वक आभार मानतो.

२. आमदार रामभाऊ मंडलिक यांना लिहिलेल्या दि. २.९.१९५३ च्या पत्रात कर्मवीरांनी जातीयतेविरुद्धची आपली भूमिका स्पष्ट केली आहे.

३. 'लोकसेवक' च्या वाढदिवसानिमित्त कोल्हापूर येथे केलेल्या भाषणाचा वृत्तान्त, 'दै. लोकसेवक' दि. ४.७.१९४८.

४. खासदार नारायणराव काजरोळकर यांना लिहिलेले पत्र, दि. २७.७.१९५६.

५. सोलापूर येथील भाषणाचा वृत्तान्त, सोलापूर समाचार, दि. ८.४.१९५०.

६. श्री. वापूसाहेव नाथाजी नलावडे यांना लिहिलेले पत्र, दि. २.१०.१९५० आणखी पाहा – 'मानवता' या पाक्षिकास पाठविलेला संदेश, दि. ६.३.१९५६.

७. महर्षी अण्णासाहेव शिंदे पुण्यतिथीला अहिल्याश्रम, पुणे येथे दि. २.१.१९४८ रोजी दिलेल्या भाषणाचा वृत्तान्त, *कर्मयोगी* पृ. १४.

८. सोलापूर समाचार, दि. ८.४.१९५०.

९. 'द टाइम्स ऑफ इंडिया', ११ डिसेंबर १९३०.

१०. *कर्मयोगी,* पृ. १४, क्र. ७ प्रमाणे.

११. तत्रैव

१२. 'मानवता' या पाक्षिकास पाठविलेला संदेश, दि. ६.३.१९५६.

१३. "वौद्ध धर्म हा सत्य, अहिंसा व समतेचा धर्म आहे. या धर्मामुळेच अखिल दलितांची खरी उन्नती होणार आहे." एम.के. मोरे, अध्यक्ष, भारतीय वौद्ध महासभा, पुणे, यांना पाठविलेले पत्र, दिनांक १४.४.१९५९.

१४. 'मानवता' या पाक्षिकास संदेश, दि. ६.३.१९५६.

१५. तत्रैव

१६. शिवजयंतीनिमित्त शिवाजी तरुण मंडळ, कोल्हापूर, येथे दि. १७.५.१९५३ रोजी केलेल्या भाषणाचा वृत्तान्त 'दै. सत्यवादी', कोल्हापूर, दि. १८.५.१९५३.

१७. तुकारामवीजेला लोखंडी जथ्था मराठा कामगार संघ, मुंबई, येथे केलेल्या भाषणाचा वृत्तान्त. 'लोकमान्य', मुंबई, दि. २२.३.१९४९.

१८. ना.ह. आपटे यांना पाठविलेले पत्र, दि. २.२.१९४६.

१९. श्री. पांडुरंग वाळाजी कवडे यांच्या *तुकाराम चरित्रा*ची प्रस्तावना म्हणून पाठविलेले पत्र, दि. २०.२.१९५६.

२०. 'लोकमान्य', मुंबई, दि. २२.३.१९४९.

२१. तत्रैव.

२२. वा.सी. वेंद्रे यांनी कर्मवीरांना लिहिलेले पत्र, दि. २१ मार्च १९५५.

२३. शिवजयंतीउत्सवात कोल्हापूरच्या शिवाजी तरुण मंडळासमोर केलेल्या भाषणाचा वृत्तान्त, 'दै. सत्यवादी', दि. १८.५.१९५३.

२४. कर्मवीरांची मुलाखत, 'दै. विशाल सह्याद्री', दि. १०.८.१९५८.

२५. नामदार गणपतराव तपासे यांना लिहिलेले पत्र, दि. ३.८.१९५६

२६. कृ.भा. वावर यांना लिहिलेले पत्र, दि. ३.८.१९५६ *कर्मयोगी,* पृ. ७९. आणखी पाहा (१) "शाहूमहाराज यांच्याशी माझा संवंध आल्यावर त्यांनी ज्या गोष्टी मला सांगितल्या त्या मी आचरणात आणीत आहे." 'दै. सत्यवादी' १८.५.१९५३. (२) "माझे व माझ्या कार्याचे शाहूमहाराज स्फूर्तिस्थान आहेत." 'दै. विशाल सह्याद्री', पुणे १०.८.१९५८. (३) "छत्रपती शाहूमहाराज यांनी समाजावरती, घराण्यावरती व व्यक्तीवरती फार मोठे उपकार करून ठेवले आहेत. त्यांच्या तत्त्वाप्रमाणे काहीतरी भरीव कार्य करणे व त्यांच्या ऋणातून मोकळे होणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे. त्यांपैकी मी एक आहे. त्यांचे ऋण फेडण्याच्या हेतूनेच माझ्या कार्यास सुरुवात केली आहे." 'सत्यवादी'कार वाळासाहेव पाटील यांना लिहिलेले पत्र, दि. १९.७.१९५२.

२७. इचलकरंजी येथे गांधीजींच्या तत्त्वज्ञानावर दिलेल्या भाषणाचा वृत्तान्त, 'नवभारत', दि. ३०.९.१९५०.

२८. क्षात्र जगद्गुरू करवीर, कोल्हापूर यांनी कर्मवीरांना लिहिलेले पत्र, दि. ११.१.१९४३.

२९. महात्मा फुले पुण्यतिथीनिमित्त फुले मंडई, पुणे, येथे केलेल्या भाषणाचा वृत्तान्त, 'ज्ञानप्रकाश', दि. ३०.१.१९४८.

३०. वा.ना. येडेकर यांना लिहिलेले, दिनांक नसलेले, पत्र.

३१. मुलाखत, 'दै. विशाल सह्याद्री', दि. १०.८.१९५८.

३२. वसंत व्याख्यानमाला, वाई समारोपाच्या भाषणाचा वृत्तान्त, 'दै. लोकमान्य', मुंबई, दि. २५ मे १९५१.

३३. बापूसाहेब नाथाजी नलावडे यांना लिहिलेले पत्र, दि. २.१०.१९५०.

३४. नारायणराव काजरोळकर यांना लिहिलेले पत्र, दि. २९.१२.१९५१.

३५. महात्मा गांधींना श्रद्धांजली वाहताना केलेले भाषण, दि. १२.२.१९४८.

३६. मालोजीराजे नाईक निंबाळकर यांना लिहिलेले पत्र, दि. २५.८.१९४९.

३७. महात्मा गांधींना श्रद्धांजली वाहताना केलेले भाषण, दि. १२.२.१९४८.

३८. व ३९. 'मानवता' या मुंबई राज्य दलित संघाच्या पाक्षिकास पाठविलेला संदेश, दि. ६.३.१९५६.

४०. लक्षनिधी अर्पण समारंभातील उत्तराचे भाषण, दि. २७.११.१९४८.

४१. निधी अर्पण समारंभास म. गांधी यांचा संदेश, दि. ९.१.१९४८.

४२. नामदार गणपतराव तपासे यांना पत्र, दि. ३.८.१९५६.

४३. अमरेंद्र गाडगीळ यांच्या *लोकसेवक ठक्करबाप्पा* या पुस्तकावरील अभिप्राय कळविणारे पत्र, दि. ११.९.१९५७.

४४. ठक्करबाप्पांना कर्मवीरांनी वाहिलेली श्रद्धांजली, 'दै. मन्वंतर', पुणे, दि. २८.१.१९५१.

४५. तत्रैव.

४६. 'प्रयत्न', वर्धा या मासिकात शुभसंदेश पाठविणारे पत्र, दि. १०.१.१९५६, *कर्मयोगी* पृ. ७४-७५.

४७. श्री गाडगेमहाराजांनी कर्मवीरांना पाठविलेले पत्र, दि. १६.११.१९४२.

४८. श्री संत गाडगेमहाराज मिशनच्या वतीने यशवंत शिंदे यांनी नाशिकहून पाठविलेल्या दि. ६.२.१९५७ च्या पत्रात कर्मवीरांचे वरील उद्‌गार त्यांनाच कळविले आहेत.

४९. कार्यवाह, श्री. संत गाडगेमहाराज मिशन, यांचे पत्र, दि. २६.११.१९५३.

५०. श्री. शिवाजी विद्यालय, अमरावती, येथे वार्षिक स्नेहसंमेलनाच्या वेळी केलेले भाषण, दि. ३१.१२.१९५०.

५१. नारायणराव काजरोळकर यांना लिहिलेले पत्र, दि. २९.१२.१९५१.

५२. डॉ. बाबासाहेब आंबेडकर, 'जनता', अग्रलेख, दि. १०.२.१९३४.

५३. नारायण काजरोळकर यांना लिहिलेले पत्र, दि. २९.१२.१९५१, हे १९५२ च्या निवडणुकीत खासदार झाले.

५४. धनंजयराव गाडगीळ, प्रस्तावना, ए.व्ही. मॅथ्यूकृत *कर्मवीर भाऊराव पाटील*, (मराठी भाषांतर वि.स. वाळिंबे), १९८८ पृ. २५-२६.

५५. एम.के. मोरे, अध्यक्ष, भारतीय बौद्ध महासभा, पुणे यांना लिहिलेले पत्र, दि. १४.४.१९५९.

५६. नारायणराव काजरोळकर यांना लिहिलेले पत्र, दि. २९.१२.१९५१.

५७. एम.के. मोरे यांना लिहिलेले पत्र, १४-४-१९५९.

५८. वा.ना. येडेकर व इतर, *वाटचाल* रयत शिक्षण संस्थेचे हीरक महोत्सव प्रकाशन, सातारा, १९८४, पृ. ६९.

५९. एम. के. मोरे यांना लिहिलेले पत्र, दि. १४.४.१९५९.

६०. खासदार नारायणराव काजरोळकर यांना लिहिलेले पत्र, दि. २७.७.१९५६.

६१. नामदार यशवंतराव चव्हाण यांना लिहिलेले पत्र, दि. १०.३.५८.

६२. भरत गुलाबचंद शहा, चालक, कूपर इंजिनियरिंग वर्क्स लि., साताररोड यांना लिहिलेले पत्र, दि. १५.११.१९५८.

६३. हे स्वतः कर्मवीरांनी नमूद केले आहे. 'आनंद' मासिकाच्या सुवर्णमहोत्सवी अंकासाठी पाठविलेला संदेश. तारीख नाही.

६४. असा गौरव चिंतामणराव देशमुख व सौ. दुर्गा देशमुख यांनी केलेला आहे. मा.भि. काटकर यांनी वा.ना. नलावडे, अध्यक्ष, रयत शिक्षण संस्था यांना पाठविलेले पत्र, दि. २२.५.१९५७.

६५. 'दै. संजय', सातारा, २ मार्च १९५६.

६६. ए.व्ही. मॅथ्यू, *कर्मवीर भाऊराव पाटील*, वरीलप्रमाणे, पृ. २८७.

६७. मागासवर्गात काम करणाऱ्या महाराष्ट्रातील कार्यकर्त्यांचे शिबिर १९५४ मध्ये सातारला धनिणीच्या बागेत भरविले होते. त्यातच हरिजन सेवक संघाने आपली बैठक घेतली. त्याविषयी आभार मानणारे उपाध्ये यांचे पत्र, दि. २७-११-१९५४.

६८. एम. के. मोरे, अध्यक्ष, भारतीय बौद्ध महासभा, शाखा पुणे, यांना लिहिलेले पत्र, दि. १४.४.१९५९.

६९. ए.व्ही. मॅथ्यू, *कर्मवीर भाऊराव पाटील*, वरीलप्रमाणे, पृ. १३५.

७०. महाराजा सयाजीराव गायकवाड यांच्यासमोर श्री छत्रपती शाहू बोर्डिंग हाऊस, सातारा, येथे कर्मवीरांनी केलेले भाषण, दि. ४.४.१९३३.

७१. 'A Review of Education 1855 to 1955 in Bombay State' उद्धृत, *वाटचाल*, उनि, पृ. ४१.

७२. श्री. जयप्रकाश नारायण यांचा अभिप्राय, दि. १७-६-१९४६ वा.ना. येडेकर व इतर *वाटचाल*, वरीलप्रमाणे, पृ. ७०.

७३. अहमदनगर जिल्हा लोकल बोर्डाने दिलेल्या संयुक्त मानपत्र समारंभातील कर्मवीरांचे भाषण, दि. १७.३.१९४९ 'ज्ञानप्रकाश', पुणे २३-३-१९४९.

७४. धनंजय कीर *डॉ. आंबेडकर – जीवन आणि कार्य*, पृ. ८० तळटीप.

७५. ए.व्ही. मॅथ्यू *कर्मवीर भाऊराव पाटील* वरीलप्रमाणे, पृ. १५७.

७६. वा.ना. नलावडे यांना लिहिलेले, दिनांक, नसलेले पत्र.

७७. देवदत्त दाभोलकर या समितीचे अध्यक्ष होते. त्यांनी ही बाब नोंदविली आहे. पाहा – 'रयत शिक्षणसंस्थेची हीरक महोत्सवी स्मरणिका', सातारा, १९६२, पृ. १.

७८. टी.एम. चौधरी यांना कर्मवीरांनी पाठविलेले पत्र, दि. १०.१.१९५५.

७९. मा.भि. काटकर *प्रबोधनाची धगधगती मशाल*, सातारा, १९८९, पृ. १३३ वरून उद्धृत.

८०. पं.रा. कानवडे यांनी नगरहून कर्मवीरांना पाठविलेले पत्र, दि. १७.१२.१९५८.

८१. जैन संस्थान मठ, कोल्हापूर, दि. १.१०.१९३३ चे पत्र.

८२. श्री. म. माटे यांनी कर्मवीरांना लिहिलेले पत्र, दि. २७.४.१९५३.





अनुक्रमणिका








# विश्वाची जडणघडण

मुकुंद सदाशिव गोखले

स्वामी स्वरूपानंदांनी एके ठिकाणी उपदेश केला आहे की, स्वरूपबोध होण्यासाठी खालील प्रश्नांचा प्रयत्नपूर्वक शोध घ्यावा – "मी म्हणजे कोण? कोठुनि जन्मा आलो? जन्मोनिया काय करणे उचित? देहांतीं कोठे जाणे असे? विश्व म्हणजे काय? ते कसकसे होत जाते?" इत्यादि. आद्य शंकराचार्य, मराठीचे आद्य कवी मुकुंदराज, स्वामी समर्थ रामदास यांच्याही अशाच उक्ती आढळतात. रमणमहर्षी 'कोहं'चे चिंतन प्रतिपादीत, तर नाथपंथामध्ये 'सोऽहं'चा जप श्वासोच्छ्वासागणिक करावयास सांगतात.

ज्ञानराजांनी तेराव्या अध्यायात या प्रश्नांची खुलासेवार उत्तरे देऊन **ज्ञानमार्ग** विशद केला आहे. क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांना नीट समजणे म्हणजे ज्ञान असे गीतेतच आहे, तर त्यांच्यातील अंतर समजून घेण्यासाठी चतुर लोक ज्ञानियांचे उंबरठे झिजवतात असे *ज्ञानेश्वरी* म्हणते. 'विश्वाची उभारणी आणि संहारणी' असे शीर्षक देऊन लोकमान्य टिळकांनी या विषयाचा ऊहापोह केला आहे. प्रवचनाच्या ओघात या विषयाच्या काही थोड्याफार ओव्या इतरत्र आल्या तरी *ज्ञानेश्वरी*च्या तेराव्या अध्यायातच त्या प्रामुख्याने येतात.

तेराव्या अध्यायातील सुरुवातीच्या ओव्यांत 'क्षेत्र म्हणजे देह, व क्षेत्रज्ञ म्हणजे ते जाणणारा' अशी सोपी ओळख असली तरी ती फक्त प्राथमिक आहे व पुढे पुढे या संकल्पनांच्या खूपच गहिराईत तीक्ष्ण-तरल बुद्धीने प्रवेश करावा लागतो, नाहीतर फसगत होते. क्षेत्र संकल्पनेचा विस्तार सुमारे १६० ओव्यांत करून शेवटी ज्ञानेश्वर म्हणतात, 'येथे पापपुण्य पिकतं म्हणून आम्ही कौतुकाने शेत असं नाव दिलं. यात (Outer Bound) परब्रह्म येत नाही; पण तेथपासून सर्व स्थावर वस्तूंपर्यंत "जे कांहीं होते जाते। क्षेत्रचि ते।". अत्याधुनिक विज्ञान फील्ड शब्दाची व्याप्ती अशीच सांगते. चुंबकाभोवती चुंबकशक्तीची जशी अदृश्य वलये असतात तशीच शक्ति-स्पंदने प्रत्येक अणुरेणूंना असतात. किंबहुना, हे विश्व म्हणजे अवकाशशून्यात वावरणाऱ्या असंख्य शक्तिस्पंदनांच्या क्षेत्रांचेच बनले आहे. त्या स्पंदनसंघर्षामधून अगणित परमाणू (Particles and Anti-particles) निमिषार्धात उत्पन्न होतात व विलय पावतात. मुळात (Big Bang मध्ये) ही स्पंदने एकाएकी कशी सुरू झाली हे विज्ञानाला कळत नाही; पण झाली खरी, व त्यातून हळूहळू या विश्वाने आकार घेतला, असे अत्याधुनिक शास्त्रज्ञ म्हणतात. वेदान्तानुसार अमूर्त परतत्त्व मूळ मानले तर ज्ञानेश्वरांनी श्रीकृष्णाच्याच तोंडी "येर आत्मतत्त्व उदासीन। ते ना हेतु ना उपादान। ना अंगे करी संवाहन। कार्यसिद्धीचे।।" अशी स्पष्टोक्ती घातल्याने मन-बुद्धीपलीकडे असलेल्या परमात्म्याचा आदिसंकल्प हे फक्त समजूत घालण्याचे कवित्व भासते; आणि उलटपक्षी "अमूर्ती तिये विशुद्धे। महदादि भूतभेदें। ब्रह्मांडाचे बांधे। होचि लागती।।" ही मूलगामी ओवी जास्त सयुक्तिक, शास्त्रशुद्ध व विज्ञानाशी जुळती क्षेत्र-संकल्पना प्रतीत करवते.

विश्वाच्या जडणघडणीसंबंधी भारतीय इतिहासाच्या दृष्टीने (मूळ गीतेत नसताना) ज्ञानेश्वरांनी रेखाटलेला क्षेत्र-संकल्पनेचा विकासही लक्षणीय आहे. ते म्हणतात, 'थोरामोठ्यांनी यावाबतीत आपली बुद्धी पणाला लावली. नैमिषारण्यात ऋषींमध्ये वादविवाद रंगले. वेदांची बडबड ('बोभाणे') यासाठीच आहे. ही वाटाघाट करताना षट्दर्शने टेकीस आली. या एका प्रश्नावरून शास्त्राशास्त्रांत जगभर वादविवाद चालू असतात (अत्याधुनिक Big Bang, Expanding Universe, Alternating प्रलय व उत्सर्जन इ.) आणि "घरोघरीं कपाळ। पिटवित असे।।" इतकेच काय, ज्ञानेश्वरांनी मुद्दाम दोन ओव्या टाकल्या आहेत की, "चार डोकी (Personal Computers) इतकी विद्वत्ता लाभलेल्या ब्रह्मदेवाला नीट उमज पडेना आणि खुद्द महेशाला ही क्षेत्रसंबंधी गुंतागुंत उलगडेना म्हणून वैतागून त्याने कैलासाचे राज्य सोडले व स्मशानात जाऊन राहिला." स्वतःला 'महेशान्वयसंभूत' म्हणवून घेणाऱ्या ज्ञानेश्वरांनी मूळ

* मुख्यतः *ज्ञानेश्वरी*च्या अध्याय १३ मधील काही महत्त्वाच्या ओव्यांच्या आधारे येथे विवेचन केले आहे.

अनुक्रमणिका

गीतेत नसलेली ही कथा आपल्या ओवीत मुद्दाम गुंफावी इकडे दुर्लक्ष करणे योग्य नाही. वरील ओवीला *एका दृष्टीने* साथ देणारी एक ओवी अकराव्या अध्यायातही आहे : "तरी विश्वात्मक रूपडे। जे दाविले आम्ही तुजपुढें। ते शंभूहि परी न जोडे। तपें करतां।।" द्वारका व अयोध्या येथील पुरातत्त्ववेत्त्यांच्या उत्खननावरून कृष्ण व राम हे आपले (इति-ह-आस) पूर्वज होते, पौराणिक (Mythological) भाकडकथा नव्हेत असे दिसते; त्याचप्रमाणे हिमालयाच्या देवभूमीत प्राक्-ऐतिहासिक कालात वसाहत करणारे ब्रह्मा आणि ईश हे आपले पूर्वज महामानव तर नव्हते **याचा सखोल, प्रदीर्घ विचार करावयास लावणाऱ्या या *ज्ञानेश्वरी* ओव्या आहेत; 'कवित्व' नव्हे.**

परंतु परंपरावादी पारायणात अर्थाकडे दुर्लक्षच होते आणि 'तज्जपः तदर्थभावनम्' हे पातंजलसूत्र पुस्तकातच राहते. याचे आणखी एक उदाहरण म्हणजे तेराव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकामध्ये श्रीकृष्णाने "हेतुमद्भिः विनिश्चितैः ब्रह्मसूत्रपदैः" असे स्पष्ट म्हटलेले असताना (*सगळ्या नव्हे पण*) *काही*, विशेषतः परंपरावादी *ज्ञानेश्वरी* लेखनिकांनी ओवी क्र. ८६ मध्ये 'ब्रह्मसूत्र' याऐवजी 'वृहत्सामसूत्र' शब्द वापरला आहे. अध्याय १०, श्लोक ३५ वरील ओवीमध्ये वृहत्सामचे भाषांतर वृहत्साम असेच केले आहे; अध्याय १७, ओवी ८५ मध्ये ब्रह्मसूत्र हा शब्द स्वतंत्रपणे आला आहे; मग तेराव्यातच ही गफलत केव्हा, कशी झाली याचे विवेचन पारायणवादी तर नाहीच पण व्याख्याते, प्रवचन-कीर्तनकार का करीत नाहीत?

क्षेत्राप्रमाणेच, क्षेत्रज्ञाच्या व्याख्येतही खोल जावे लागते. सुरुवातीला 'क्षेत्रज्ञ म्हणजे मी' अशी प्राथमिक जुजवी ओळख आहे, पण पुढे "आतां क्षेत्रज्ञु येणे। नामें जयाते बोलणे। जगजीवु का म्हणे। जिये दशेते।। जो आपुलेनि विसरे। सर्व भूतत्वे अनुकरे। तो आत्मा बोलिजे क्षरे। पुरुष नामें।। अज्ञान थोरिये जाणिजे। परी आपणपें नेणिजे। ते रूप जाणिजे। क्षेत्रज्ञाचे।। तेया **गुंडलिया प्रकाशा**। क्षेत्रज्ञु नाम।।" (ठळक ठसा प्रस्तुत लेखकाचा) असे स्पष्टीकरण श्रीकृष्णाच्या तोंडी आहे. म्हणजे **क्षेत्रज्ञ हा परमात्मा नव्हे**. पुढे पंधराव्या अध्यायात स्पष्टच आहे. "एवं पुरुष क्षराक्षर। देखोनी दोन्ही अवर। यातें म्हणती पर-। -आत्मरूप।।" म्हणजे उत्तम पुरुष. त्याचेच जणू सूतोवाच तेराव्या अध्यायात आहे : 'तैसे आत्मा देही। म्हणती जे कांहीं। ते साचे तरी नाहीं।।"

पुरुष शब्दाबद्दल ही फोड लक्षात ठेवून, खालील ओव्या पाहिल्या तर क्षेत्र-प्रकृति-माया या संकल्पनांचा परस्परसंबंध स्पष्ट होतो : –

१) "पै क्षेत्र येणे नामे। जे सांगितले आघवे। तेचि येथ जाणावे। प्रकृति गा।।
२) आणि क्षेत्रज्ञु ऐसे। जयाते म्हणितले असे। तो पुरुष हे अनारिसे। न बोलो घेई।।
३) इये आनाने नांवें। परी निरूप्य आन नोहे। **हे लक्षण न चुकावे। पुढतपुढतीं**।। (ठळक टाईप प्रस्तुत लेखकाचा)
४) वेदांती इये ते माया। ऐसे म्हणती प्राज्ञराया। असो, किती बोलो वायां। अज्ञान हे।।
५) ते माया वस्तूचे ठाई। असे जैसेनि नाहीं। मग वस्तुप्रभाचि पाही। प्रकट होय।।
६) तैसी प्रकृति आत्मप्रभा। खेळें गुणीं विविधारंभा। तेथ आत्मा तो बोथंवा। नेणे कोण।।
७) आणि महाभूतांदिकीं। प्रभेदिली अनेकीं। पसरलीसे लटिकी। प्रकृति जे हे।।
८) अनित्यत्व विश्वा कैसे। तेचि वृक्षाकारमिषे। सांगितले असे विश्वेशें। पंचदशी।।"

लक्षात घेण्यासारखी महत्त्वाची गोष्ट ही की, फक्त शंकराचार्यच माया मानतात असे बिलकूल नसून त्या 'मिथ्या' मायेला ज्ञानेश्वरही मानतात. इतकेच नाही तर 'लटिकी' म्हणतात. **या दोन्ही विशेषणांचा अर्थ 'खोटी' असा नसून 'वरवरची' असा आहे.** तांदळाचा कण महत्त्वाचा, त्यामानाने वरवरचे तूस दुर्लक्षिण्याजोगे. "ऊस डोंगा परी। रस नोहे डोंगा। का रे भुललासी। वरलिया सोंगा।।" हे चोखामेळ्यालाही समजले, पण वरवर पारायणे करणाऱ्यांना समजत नाही; 'प्राक् प्रबोधनात् जगत् सत्यमेव' असे शांकरभाष्यात आहे, पण हल्लीचे विद्वान ते वाचीत नाहीत हे सामाजिक दुर्दैव आहे. या मायेला ज्ञानदेव 'नाना शक्तींचे मांदुस' मानतात, *पंचदशी*कार विद्यारण्यस्वामी 'अचिंत्यरचनाशक्तिबीजं मायेति निश्चिनु' म्हणतात, तर अत्याधुनिक Post-Quantum विज्ञानशास्त्री Storehouse of infinite, invisible Energy Fields, wherefrom solid matter appears randomly once in a way – म्हणजे, ऊर्जेच्या (विमल ठकारांचा शब्द) त्या अथांग तळ्यावर क्वचित तरंगणारे ठोस घन विश्व – समजतात. नोबेल लॉरिअट श्रोडिंजर तर माया हाच शब्द वापरत असे.

विश्वाच्या जडणघडणीसंबंधीचा भारतीय तत्त्वविचारातील महत्त्वाचा मुद्दा असा की, 'वस्तु' म्हणजे आत्मा केंद्र असून, त्याची प्रभा (उपर्युक्त ओवी क्र. ५ व ६) पंचमहाभूते, मन, बुद्धी, अहंकार इ. घटकमिश्रणाने चराचर विश्वाचे रूप धारण करते. यालाच *ज्ञानेश्वरी* चिद्-विलास (हा शब्द वापरला नसला तरी) मानते. या घटकांची साम्यावस्था म्हणजे जीवरूपा पराप्रकृती. चुंबक लोखंडाच्या तुकड्याला भिरभिर फिरवतो त्याप्रमाणे "आत्मसंगति इये शरीरीं। सजीवत्वाचा करी। उपेगु जडा।।" (ओवी १३।१४१) त्रिगुणात्मक प्रकृतीचा विस्तार चौदाव्या अध्यायात आहे. प्रकृती गुणमयी आहे, तिच्यातील तेजतत्त्वाची व सत्त्वगुणाची वृद्धी म्हणजेच बुद्धी निर्माण होऊन ती जीव व आत्मा यांच्या सांध्यावर राहते; बुद्धी रजतमगुणांनी भारावली म्हणजे मन बनते व ते आत्म्याऐवजी इंद्रियांकडे मोहरा फिरवते; कल्पनेला अवयव फुटले म्हणजे होणारी त्याची वळवळ आत्म्याला जीवदशेला आणते; "ममता (माझेपणा) तरुणी मनाची। ती अहंकार (Ego) तत्त्व रची।" इत्यादि विश्वाच्या जडणघडणीची उपपत्ती तेराव्या अध्यायात आहे. शब्द निराळे असले तरी येथपर्यंतच्या क्षेत्रकल्पनेशी मेळ खाणाऱ्या पाश्चात्त्य विज्ञानाचा संदर्भ पुढील परिच्छेदात उल्लेखून, नंतरच्या परिच्छेदात पुनः भारतीय संकल्पनेच्या दुसऱ्या म्हणजे क्षेत्रज्ञ भागाकडे वळू; कारण पाश्चात्त्य अजून तेथे पोचावयाचे आहेत.

Molecule, Atom, Particle, Quark, Gluon (किंवा Kuon) अशा संज्ञांच्या आधारे वैज्ञानिक क्षेत्र (Field), शून्य (Void) इथपर्यंत विसाव्या शतकाच्या सुमारे मध्यावर पोचले होते. त्यानंतर डॉ. डेव्हिड बोम, वाइग्मर, व्हीलर प्रभृती शास्त्रज्ञांच्या विचारे मुख्यतः दोन कल्पना पुढे आल्याः एक वैश्विक चैतन्याला (Consciousness) पदार्थविज्ञानात स्थान असले पाहिजे, कारण कदाचित अणुरेणूंतदेखील काही प्रतीची चित्शक्ती (some sort of consciousness) असावीसे त्यांनाही वाटते. "जडाजडीं अंशीं। राहटे जे सरशी। ते चेतना।" (म्हणजे चैतन्याची सत्ता) हे तेराव्या अध्यायात आहेच. वैज्ञानिकांची दुसरी कल्पना : Super Implicate Order किंवा Consciousness ही अनंत मितीत (Multi dimensions) वावरते आणि तिच्या (Projections) पडछाया म्हणजे त्रिमितीतील दृश्य विश्व, मन, जीव वगैरे या Holograph सारख्या भासमान होतात; म्हटलं तर व्यावहारिक, प्रातिभासिक सत्ता (किंवा सत्य), पण पारमार्थिक सत्य (Ultimate Reality) नव्हे. या कल्पनांचा पाठपुरावा झाला तर कदाचित वैज्ञानिक 'क्षेत्रा'च्या पुढे जाऊन 'क्षेत्रज्ञ' गाठतीलही. दरम्यान मुद्दाम नमूद करण्यासारखी विस्मयकारक गोष्ट म्हणजे विश्वरूपदर्शनाने वावचळून, घावरून अर्जुनाने जेव्हा कृष्णरूप पाहण्यास मागितले तेव्हा ज्ञानेश्वरांनी कृष्णाच्या तोंडी उद्‌गार घातले आहेत : "या अर्जुनाचिया बोला। विश्वरूपा विस्मयो जाहला। म्हणजे ऐसा नाहीं देखिला। धसाळ कोणी।। ते जे अपरांअपार। स्वरूप माझे परात्पर। जेथूनि ते अवतार। कृष्णादिक।। परी नेणसीच गांवढिया। काय कोपो आतां धनंजया। **आंग सोडोनि छाया। आलिंगितोसी**।। हे नव्हे, मी जो साचे। तेथ मन करूनिया काचे। प्रेम धरिसी **अवगणियेचे। चतुर्भुज जे**।।" (ठळक टाइप प्रस्तुत लेखकाचा.)

याचा अर्थ, अनंतमितीमधील परात्पर वस्तूची त्रिमितीवरची छाया म्हणजे कृष्णरूप Holograph असेच ज्ञानेश्वरांना अभिप्रेत होते का? गीतेत हे स्पष्ट नाही; आपल्या कृष्णश्रद्धेवद्दल शंका नको म्हणून ज्ञानेश्वरभक्तही गप्प बसतात हे दुर्दैव आहे. असो.

क्षेत्राच्या मानाने क्षेत्रज्ञावद्दल *ज्ञानेश्वरी*त फार ओव्या नाहीत याचे दुसरे कारण प्रकृति-पुरुषावद्दलच्या ओव्यांत ते वर्णन अध्याहृत आहे; इतकेच नाही तर, या दोन संकल्पना एकमेकांना पूरक (complementary) आणि व्यवच्छेदक (differentiated) असल्याने मूलगामी व हृदयंगम आहेत. त्यामुळे साधकाला जोपासावयाचे काय आणि डावलावयाचे काय हा नीरक्षीरविवेक येतो. त्या अमूर्त पुरुषाला प्रकृती मूर्त स्वरूपात आणते. "निराकाराचा आकारु। निर्व्यापाराचा व्यापारु। निरहंकाराचा अहंकारु। होऊनी ठाके।।" अनामाचे नाम, अचर्चाचे चिन्ह, अपाराचे मान (दंड), अमनस्काची मनबुद्धी, निर्गुणाचे गुण, अचक्षूचे चक्षू, भावातीताचे भाव, "किंबहुना होय सर्व। पुरुषाचे ती।। मा इये प्रकृति तंव। गुणमयी हेचि नांव। किंवहुना सावेव। गुण तेचि ती।। ऐसेनि इये प्रकृती। आपुलिये सर्वव्याप्ती। तया अविकाराते विकृति –। माजी कीजे।।"

यामुळे होतं काय? "संता संते कर्मे। प्रकृतिस्तव होतें। तया दोहींचा भोगु।। (क्षर) पुरुषा।" याचे कारण, ज्ञानेश्वर सांगतात, एकच : "म्हणोनी या तिहीं जाणा। कार्य, कर्तृत्व, कारणा। प्रकृतिमूळ, हे राणा। सिद्धांचा म्हणे।। **प्रकृती करी कर्मे। तीं म्यां केली म्हणे भ्रमें।** तेथ कर्ता येणे नामें। बोलिजे







अनुक्रमणिका

जीवु ।।" (ठळक टाइप प्रस्तुत लेखकाचा) हे तादात्म्य कटाक्षाने टाळता आले तर काय होईल? "जो निखळपणे येणे। यया पुरुषाते जाणे। आणि गुणांचे करणे। प्रकृतीचे ते।। तेणे पाडे अर्जुना। प्रकृतिपुरुष विवंचना। जयाचिया मना। गोचर जाहली।। तैसी वेगळी वेगळेपणे। प्रकृति जे अंतःकरणे। देखती, ते मी म्हणे। ब्रह्म होती।।" असा निर्वाळा ज्ञानेश्वर देतात. म्हणून क्षेत्र-क्षेत्रज्ञ, प्रकृति-पुरुष ज्ञानाचं महत्त्व. **यासाठी 'मी कपिल जाहलो' असं ज्ञानेश्वरांनी कृष्णाच्या तोंडी घातले आहे;** 'शस्त्रधारींमध्ये माझी विभूती दाशरथी राम' एवढंच आहे, 'राम हा यापूर्वीचा माझा अवतार' असे म्हटले नाही. सारांश, "ऐसा तया एकु। प्रकृतिपुरुषविवेकु। उपकार अलौकिकु। करी पैं गा।।" हे साधकांच्या दृष्टीने महत्त्व.

मग काय उरतं विश्वाच्या जडणघडणीत? तर "आकारु जेथ सरे। जीवित्व जेथ विरे। द्वैत जेथ नुरे। अद्वयजे।।" असं निखळ आत्मतत्त्व. येथे प्रकृतिग्रस्त क्षर पुरुषाची वाटचाल उत्तमपुरुषाच्या दिशेने कशी होते ते ज्ञानेश्वरांना सुचवावयाचे आहे. त्या वस्तूचे वर्णन ज्ञेय म्हणून करतात : "नामरूपसंबंधु। जाति क्रिया भेदु। हा आकारासी प्रवादु। वस्तुसी नाही।। नाही द्रष्टा दृश्य स्थिती। तरी कोणे कैसे आथी। म्हणावे गा?" याच्या पुढे जाऊन विलक्षण शब्द आहेत : "वाचूनी हस्त नेत्र पादे। हे भाष तेथ कै आहे। सर्व शून्यत्वाचा न साहे। निष्कर्षु जे।।" म्हणूनच "**तो सृजी, पाळी, संहारी। ऐसे बोलती जे चराचरी। ते अज्ञान गा अवधारी।** पंडुकुमरा।। साचचि जे एक। तेथ कै व्याप्यव्यापक। परी बोलावया नावेक। करावे लागे।। शून्य जै दावावे जाहले। तै एक बिंदुले करणे चाहले। तैसे अद्वैत सांगावे बोले। तै द्वैत कीजे।।" (ठळक टाइप प्रस्तुत लेखकाचा) वैज्ञानिक ज्याला Mystic Crystal म्हणतात त्या गणिता (सिद्धान्ता) चा उपयोग येथे उपमान म्हणून केला आहे. यास्तव श्रुतींनासुद्धा द्वैताची वाट धरावी लागली अशी कानगोष्ट सांगून ज्ञानेश्वर सांगता करतात : "ते परमतत्व पार्था। होती ते सर्वथा। जे आत्मानात्म व्यवस्था। राजहंसु।।" कारण ते साधक "सांडुनि अनात्मनीर, सेविती आत्मरसक्षीर".

तेराव्या अध्यायात क्षेत्र, क्षेत्रज्ञ, ज्ञान, ज्ञेय यांचे वर्णन आहे त्याचे विवेचन मुख्यतः त्या अध्यायातील ओव्यांचे शब्दांत केले. आता शेवटचा मुद्दा : या सर्वाचा साधनेशी संबंध; त्याची दखल घेऊ. संसारात राहून परमार्थ होत नाही का, या प्रश्नाविषयी उलटसुलट संतवचने (विशेषतः *दासबोधा*तली) देऊन वाद चालतो. त्याची उकल *ज्ञानेश्वरी*मध्ये विलक्षण आहे. "इंद्रियांचेनि मेळे। जरी विषयावरी लोळे। परी तेथिचेनि विकारें लिंपिनेना।।" प्रथमदर्शनी हे शब्द चक्रावतात, पण इतर ओव्यांच्या संदर्भात चांगले कळतात. "देह तरी वरिचिलीकडे। आपुल्यापरी हिंडे। परी बैसका न मोडे मानसीची।। तो आइके। देखे वा भेटे। परी मनीं कांहींच नुमटे। मेघरंगे न काटे। व्योम जैसे।।" या तेराव्या अध्यायातील ओव्या स्पष्ट करतात की, अध्यात्मात् मनाची गुंतागुंत कटाक्षाने सुधारावी लागते. याला पूरक अशी तिसऱ्या अध्यायात ओवी आहे : "तुवां शरीरपरा नोहावे। कामनाजात सांडावे। मग अवसरोचित भोगावे। भोग सकळ।।" सारांश, "असोनी संसारी (सप्तमी), नसावे संसारी (प्रथमा)" म्हणजे मन गुंतवणारा कर्ता, भोक्ता. हे जमले नाही तर मात्र संसार परमार्थाला विघातकच. अध्यात्मात नित्य रमावे हा साधकाचा नवसच असतो. त्यासाठी "बहु एकांतावरी प्रीती। जया जनपदाची खंती। जाण मनुष्याकारे मूर्ती। ज्ञानाची तो।। म्हणे हेचि एक आथी। येर जाणणे ते भ्रांती। ऐसी निकुरेसी मती। जयाची होय।।" अशा ओव्यांमधून ज्ञानेश्वरांनी ज्ञानलक्षणे 'कैवल्यदेशीचे रावो' म्हणून गौरविली आहेत. उलटपक्षी अज्ञानावर कृष्णाचा फक्त अर्धा श्लोक आहे, त्याचा आधार घेऊन "मागां श्लोकाचेनि अर्धार्धे। ऐसे सांगितले मुकुंदें। जे उरफाटी ज्ञानपदें। तेचि अज्ञान।।" असा हवाला देत (जणू मायानदीचे वर्णन वाटावे इतका) प्रचंड विस्तार ज्ञानेश्वरांनी केला आहे. उदाहरणार्थ, "स्त्रीपुत्रादिमेळे। जंव जंव संपत्ति फळे। तेणे रजे डोळे। जाती जयाचे।। मनोरथांचिया धारिसा। वाहणे जयाचिया मानसा। पूरी पडला जैसा दुधिया होय।।" काय टाकावे व काय जोपासावे हे कळले तर ज्यायोगे बद्धाचा मुमुक्षू आणि मुमुक्षूचा साधक होऊ शकतो त्या लक्षणांची यादीच दिली आहे. हा अभ्यास करावयाचा नसेल, 'स्वैर फिरताना रत्नाची ठेच लागली तर हवी' अशा वृत्तीच्या माणसाने '*ज्ञानेश्वरी* सर्वसामान्यांसाठी नाही का?' असा प्रश्न विचारूच नये; त्याच्या जणू उत्तरादाखल ओव्या आहेत : "अहो **अर्जुनाचिया पांती। परिसणेया योग्य होती।** तिहीं कृपा करुनी संतीं। अवधान देयावे।। ऐसे हळुवारपण जरी येईल। तरीच हे उपेगा जाईल। **एरवीं अवघी गोठी होईल। मुकियाबहिरियाची।।**" (ठळक टाइप प्रस्तुत लेखकाच्या) शंकराचार्यही म्हणतातः "अध्यात्मशास्त्रे यानि

अनुक्रमणिका

कृतार्थ लक्षणानि, तानि यत्नसाध्यत्वात् साधनानीति उपदिश्यन्ते।" ज्ञानेश्वरही दिलासा देतात: "परी हाचि अंतरीं। विवेक भानुच्या परी। उदैजे ते अवधारी। उपाव वहुत।" ते निष्ठेने केले तरच "चित्त चैतन्य समरसी आंतु रते।" एरवी, नुसते खिरापत वाटप नाही हे.

या समालोचनाचा शेवट, तेराव्या अध्यायातील, जणू पसायदानाने, "दिसो परतत्त्व डोळा। पाहो सुखाचा सोहळा। रिघो महावोध सुकाळा। माजी विश्व।।" करणे उचित ठरेल.



---

पत्रव्यवहार

# 'आर्य' : एतद्देशीय की परकीय?

*नवभारत* जुलै ९८ अंकात *'आर्य' : एतद्देशीय का परकीय?* या मथळ्याचे संपादकीय आले आहे. त्यात पान तीन वर " 'शेटजी-भटजी' हा शब्दप्रयोगही त्यांनी (महात्मा फुले यांनी) वापरला" असे विधान आहे. म. फुले समग्र वाङ्मय (सुधारित ५वी आवृत्ती) यात असा उल्लेख कोठे आला आहे याचा खुलासा व्हावा. या ग्रंथात (गुजर), मारवाडी व ब्राह्मण सावकार असा संयुक्त उल्लेख मात्र चारदोन ठिकाणी आला आहे. 'शेटजी-भटजी' हा शब्दप्रयोग राजकीय वादात जेधे-मोरे यांनी १९४६-४७ साली मुंवई प्रांताच्या काँग्रेस सरकारच्या संवंधात वापरला होता.

सिंधु-संस्कृतीचा नाश कोणाच्या आक्रमणाने झाला नसून महापूर, दुष्काळ यांसारख्या प्राकृतिक कारणांनी झाला असावा असे पुरातत्त्वज्ञांचे आता मत होत आहे. त्यामुळे आर्यांच्या वाहेरून येण्याचा त्या संस्कृतीच्या वऱ्यावाईटाशी संवंध लावता येत नाही.

*पान पाच* वर 'ते (तलगेरी) जी उपपत्ती सादर करीत आहेत तिला पायाभूत आधार ते पुराणांचा देतात' असे म्हटले आहे आणि पान नऊ ते अकरावरील दीर्घ इंग्रजी उताऱ्यांवरून ते उघडही होते. या पुराणांविषयी तर्कतीर्थांच्या *वैदिक संस्कृतीचा विकास* ग्रंथात (पृ. २९३) म्हटले आहे : "पुराणातील इतिहासात अद्‌भुत वर्णने, अतिशयोक्ती व कल्पनाविलास ह्याचा भाग असल्यामुळे वास्तविक इतिहासाचा अंश पूर्णपणे झाकून गेलेला असतो. इतिहासाचा भाग कोणता व केवळ काल्पनिक अंश कोणता याचा विवेक करणे वहुशः अशक्य होते. भूगोलवर्णन ज्याप्रमाणे काल्पनिक त्याचप्रमाणे ऐतिहासिक वर्णन काल्पनिक असते. सत्याच्या अल्पांशावर कल्पनेचा प्रचंड डोलारा पुराणातील भूगोलवर्णनात उभारलेला दिसतो; तसेच पौराणिक इतिहासाचे आहे." या प्रकारच्या साहित्यातून incontrovertible evidence मिळतो असे लेखकाने पुन्हापुन्हा म्हटले तरी ते मान्य करणे कठीण आहे.

'पुराणांमध्ये ज्या राजवंशावळी दिल्या आहेत त्या महाभारतपूर्व काळातल्या आहेत अशी मान्यता आहे' (पान आठ). *मार्कंडेय पुराण* हे सर्वात जुने पुराण मानले जाते. त्याचा आरंभच महाभारतकथेच्या संदर्भाने झालेला आहे : "मार्कंडेय मुनीला जैमिनीने विचारले, 'निर्गुण जनार्दन मानवरूपात का आला, द्रौपदी एकटीच पाच पांडवांची वायको का झाली, तिचे पाची मुलगे लग्ने न होताच अनाथासारखे कसे मारले गेले. या वावींचे मला कुतूहल आहे.' मुनी म्हणाला, 'माझी नित्यकर्माची वेळ झाली आहे. विंध्याच्या दरीखोऱ्यात द्रोणाचे पुत्र असलेले श्रेष्ठ पक्षी राहतात, त्यांच्याकडे जाऊन विचार, ते सांगतील." त्या श्रेष्ठ पक्ष्यांची जन्मकथा आणि त्यांनी सांगितलेले 'इतिहास' (!) याच अद्‌भुत, अतिशयोक्त कल्पनाविलासाच्या पातळीवरचे आहेत. अशा पुराणांतल्या राजवंशावळींचा काळ कसा ठरवायचा आणि त्यांची 'मान्यता' कशी मान्य करायची? अशा वंशावळी आलेल्या पुराणांवरून प्रोटो-प्रोटो-भापा कशी सिद्ध करता येते हेही समजणे कठीण आहे. तलगेरींनी 'अभ्यास-संशोधनाची रीत, शिस्त व पथ्ये संभाळली आहेत' अशी भलावण पान चार वर आली आहे, तिच्या संदर्भात हे प्रश्न उभे राहतात. त्या संशोधनाचा विषय असलेले वाद 'निरर्थक' असतील (पान सहा) तर या पुस्तकाची प्रदीर्घ अवतरणांसहित दखल घेण्याचे प्रयोजन समजत नाही.

पुणे

**_विश्वनाथ खैरे_**



# पुराणकालीन राज्यपद्धती

ग.वा. तगारे

**विषयव्याप्ती**

माझ्या या लेखाचा विषय पुराणकालीन राज्यपद्धती हा आहे. तथापि मी संस्कृत महापुराणांपुरतेच न बोलता पुराणकालात रचले गेलेले पुराणेतर ब्राह्मणी, बौद्ध आणि जैन ग्रंथांचे संदर्भ घेणार आहे. महाभारत रचनेचा काळ ख्रिस्तपूर्व ४ थे शतक मानला गेल्यामुळे त्यानंतर रचलेल्या साहित्याच्या आधारे हे विवेचन आहे.

या कालखंडात महाभारत आणि रामायण यांच्या संहिता बऱ्याच प्रमाणात निश्चित झाल्या. भागवत, वायु, ब्रह्मांड इ. जुनी पुराणे या कालखंडात रचली गेली. कौटिलीय *अर्थशास्त्र*, वराहमिहिरकृत *बृहत्संहिता* इ. राज्यशास्त्राच्या दृष्टीने उपयुक्त पुराणेतर ग्रंथ या कालात झाले. बौद्धांचे त्रिपिटक आणि श्वेतांबर जैनांचा अर्धमागधी आगम या कालखंडात निश्चित झाला. या कालखंडात अलेक्झांडरची स्वारी झाली. त्याच्याबरोबर आलेल्या ग्रीक इतिहासकारांनी भारतीय लोक आणि राज्यसंस्था यांचे केलेले वर्णन त्रयस्थांचे दृष्टिकोनातून असल्यामुळे उपयुक्त आहे.

काळाचा संदर्भ बदलला आहे. भारत आता राजसत्ताक नाही. या जुन्या ग्रंथकारांनी राजा हा राज्याच्या सप्तांगापैकी प्रमुख किंवा स्वामी मानून राज्यशास्त्राची चर्चा केली आहे. त्यांचा परामर्श घेणे आवश्यक आहे. अर्वाचीन मंत्रिमंडळाचे पूर्वरूप असलेल्या प्राचीन अमात्यमंडळाची घटना व कार्य यांचे किंचित दर्शन घेणे उद्‌बोधक ठरेल. आजच्या आपल्या जीवनाशी संबंध असलेल्या 'प्रजासत्ताक राज्यपद्धती', 'परराष्ट्र धोरण' अशासारख्या विषयावर मी प्राचीन ग्रंथकारांची मते थोडक्यात मांडणार आहे.

**दोन राज्यपद्धती**

या कालखंडात दोन राज्यपद्धती रूढ होत्या :

१. व्यक्तिप्रधान किंवा राजसत्ताक

२. ज्ञातिप्रधान गणराज्ये किंवा संघराज्य

या दुसऱ्या पद्धतीमध्ये विविधता असली तरी त्या व्यक्तिप्रधान, कुलपरंपरेने राज्यपद मिळणाऱ्या नव्हत्या एवढे निश्चित.

या दोन्ही पद्धती समकालीन होत्या. उदाहरणार्थ, *अवदान शतक* (II.P 103) या बौद्ध ग्रंथात परदेशातून परत आलेले व्यापारी आपल्या राजाला सांगतात :

*देव केचिद् देशा गणाधीनाः, केचिद् राजाधीनाः ।*

(महाराज काही देशात गणराज्य आहे आणि काहीत राजसत्ता आहे).

श्वेतांबर जैन आगमातील प्राचीनतम ग्रंथ आचारांगसूत्र यात जैन यतींनी कोणत्या देशात जाऊ नये हे निर्बंध घालताना पुढील यादी दिली आहे : *अरायणि, गणरायणि, जुवरायणि वा ।* [ज्या देशात अराजक असेल, गणराज्य असेल किंवा जेथील राजा युवा (minor) असेल (तेथे जाऊ नये.)]

तथापि व्यक्तिप्रधान (राजसत्ताक) आणि गणप्रधान अशा दोन्ही पद्धती भारतात प्राचीन काळापासून होत्या. उदाहरणार्थ, दाशराज्ञ युद्धात ज्या राजांनी सुदास राजाला वेढले त्यांची नावे आली आहेत. काही ऋग्वेदाच्या ७ व्या मंडलात (८३. ७-८) मिळतात.

तसेच, त्या काळात गणराज्ये असावीत असे अनु, द्रुह्यु, पुरु, यदु यांचे बहुवचनी उल्लेख आहेत (उदा., ऋग्वेद I. 108.8; VII 18.6; VIII 6.46) यावरून दिसते. हे शब्द जेव्हा एकवचनी येतात (उदा., 'यदु' म्हणजे 'यदु' गणाचा प्रमुख) तेव्हा ते व्यक्तिनाम नसून त्याचा हुद्दा किंवा पद दाखवते असे डॉ. काणे यांचे मत आहे (*हिस्ट्री ऑफ धर्मशास्त्र*, IV, p. 64). महाभारतकालीन अंधकवृष्णींच्या गणाचा प्रमुख म्हणून आपल्याला टीका सहन कराव्या लागतात आणि आपण कठोर शब्द सोसतो (*वाग् दुरुक्तानि च क्षमे*) हे कृष्णाने नारदास सांगितले आहे (*महाभारत*, शांतिपर्व, ८१-५)

**राजसत्तेचा उदय**

राजसत्तेचा उदय संरक्षणाच्या गरजेतून झाला असे प्राचीन भारतीयांचे मत होते. लष्करी नेतृत्वाची गरज लागल्यामुळे

* कै. लक्ष्मणशास्त्री मुरगुडकर यांच्या स्मरणार्थ टिळक महाराष्ट्र विद्यापीठमध्ये दिलेले व्याख्यान.

दैत्यांच्या पराभवासाठी देवांनी सोमाला राजा केले असे ऐतरेय ब्राह्मणात (१-१४.५) म्हटले आहे. दुसऱ्या प्रसंगी इंद्राला राजा केले असे शतपथ ब्राह्मणात (३-४ ९-१-३) म्हटले आहे. प्रजेने राजाची निवड करण्याची प्रथा अथवेदाचे काळात होती असे 'लोकांनी (विशः) तुला राज्य चालवण्यासाठी निवडले आहे.' (*त्वां विशो वृणतां राज्याय।*) या वचनावरून दिसते. त्या निवडीला दैवी आधार आहे हे दाखवणारे – अथर्ववेद III.४.२ – 'दिशांनी पाच देवतांनी तुला निवडले आहे' (*त्वां इमाः प्रदिशः पञ्च देवीः।* अर्थववेद III. ४.२) असे धीर देणारे वचन आहे. वयात आला नसला तरी प्रस्थापित राजघराण्यातील राजा हवा ही भावना पुढे महाभारत कालात रूढ झाली. परीक्षिताच्या मृत्यूनंतर जनमेजयाला राजा करा, अशी मागणी करून त्याला राजा केले असे महाभारत-आदिपर्व (४४-६) वरून दिसते.

राजसत्तेच्या उदयाबद्दल महाभारतात व पुराणांतून जी चर्चा आहे त्यावरून असे दिसते की, त्या सर्वांच्या मते प्राचीन काळ – कृतयुग – हा फार चांगला होता; कारण त्या काळी सर्व माणसे धर्माप्रमाणे वागत असल्यामुळे त्यांना शिस्त लावणाऱ्या व्यक्तीची, सत्तेची वा नियंत्रणाची आवश्यकता नव्हती : *न वै राज्यं च राजाऽऽसीत्, न दण्डो न च दाण्डिकः। धर्मेण च प्रजाः सर्वाः, रक्षन्ति स्म परस्परम्।।* [(त्या युगात) राज्य ही नव्हते आणि राजाही नव्हता. शिक्षा आणि शिक्षा करणारा नव्हते. सर्वप्रजा धर्माने परस्परांचे रक्षण करत.]

(*महाभारत* – शान्तिपर्व, ५९.१४)

पण पुढे, शांतिपर्वाच्या त्या (५९ व्या) अध्यायात व ६७ व्या अध्यायात म्हटल्याप्रमाणे "लोकांना मोह पडून स्वार्थ बळावला आणि अराजक निर्माण झाले." भीष्मांच्या तोंडी पुढील वचन घातले आहे :*अराजकेषु राष्ट्रेषु धर्मो न व्यवतिष्ठते। परस्परंच खादन्ति, सर्वथा धिय् अराजकम्। जले मत्स्यान् इवाभक्ष्यन् दुर्बलं बलवत्तराः।।* [ज्या राष्ट्रात अराजक असते तेथे धर्म नांदत नाही. (धर्म व्यवस्था नसते.) ज्याप्रमाणे पाण्यात मोठे बलवान मासे दुबळ्यांना खातात त्याप्रमाणे लोक परस्परांस खातात. अराजकाचा सर्वथैव धिक्कार असो.]

### राजा व प्रजा यांच्यातला करार

अशी परिस्थिती निर्माण झाल्यामुळे लोक (प्रजा) ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यांनी आपल्या संरक्षणाची मागणी केली. ब्रह्मदेवाने लोकांच्या प्रतिनिधिमंडळाचा मुख्य – राजा – म्हणून मनूची नियुक्ती केली. 'राजा ईश्वरनियुक्त आहे' अशा ध्वनित होणाऱ्या संकल्पनेला पुढे त्याच अध्यायात 'राजा आणि प्रजा यांचे संबंध हा एक करार आहे' अशा विधानाने छेद दिला आहे. महाभारतकार सांगतात : मनूची नियुक्ती झाली तरी मनू ती जबाबदारी घेण्याला नाखूष होता. मनु म्हणतो : *विभेमि कर्मणः पापाद् राज्यं हि भृशदुस्तरम्। विशेषतः मनुष्येषु मिथ्यावृत्तेषु नित्यदा।।* [मी पापकर्माला भितो. राज्य हे तरून जाण्यात अत्यंत अवघड आहे. दुर्बल लोकांवर (राज्य करणे) विशेष अवघड आहे.]

यावरील प्रजेचे आश्वासन : *तं अब्रुवन् प्रजाः 'मा भैः कर्तृन् एनो गमिष्यति। पशूनां अधि पंचाशत् हिरण्यस्य तथैव च।। धान्यस्य दशमं भागं दास्यामः कोशवर्धनम्।* [प्रजा त्याला (मनूला) म्हणाल्या : "भिऊ नकोस. पाप हे पाप करणाराला लागेल (पाप करणाराकडे जाईल.) सोने आणि पशू आणि तुझा कोश (भांडार) वाढवण्यासाठी धान्याचा एकदशांश भाग आम्ही देऊ.] (*महाभारत*, शान्तिपर्व ६७.२२-२४)

हा स्पष्टपणे राजा व प्रजा यांच्यातील करार आहे. बौधायन या धर्मसूत्रकाराने 'राजा प्रजेचा नोकर' आहे. त्याला प्रजेकडून जो षष्ठांश (भाग) कर मिळतो ते त्याचे वेतन आहे. त्या वेतनावर त्याने प्रजेचे पालन करावे, असे म्हटले आहे. *षड्भागभृतो राजा रक्षेत प्रजाम्।* (*बौधायन धर्मसूत्र*, १.१०-६)

*शुक्रनीती*त म्हटले आहे : 'ब्रह्मदेवाने एक षष्ठांश भाग देऊन राजाला प्रजेचे दास केले आहे.' *स्वभागभृत्या दास्यत्वे प्रजानां च नृपः कृतः।* (I.१८८)

हा राजा आणि प्रजा यामधील करार आहे. राजा मर्यादा सोडून वागला तर प्रजेकडून प्रायश्चित्त मिळे याचे पुराणांतरी दाखले आहेत. राजा पुरुरवा ऋषींचा चालू असलेला यज्ञ पाहावयास आला असता, त्याला यज्ञवेदीवरील सोन्याची भांडी पाहून लोभ सुटला. त्याने ती भांडी लुटण्याचा प्रयत्न केला तेव्हा यज्ञकर्त्या ऋषींनी त्याला ठार मारले (*ब्रह्मांडपुराण*, I-92.20-23, संदर्भ : *महाभारत*, आदिपर्व ७५.२०-२३). वेन राजाला जुलमीपणामुळे ब्राह्मणांनी शाप देऊन मारले. (*महाभारत*, शांतिपर्व ५९.९४). नंतर पृथूला गादीवर बसवण्यापूर्वी 'मी धर्माने राज्य करीन. स्वैरपणे वागणार नाही' अशी शपथ घ्यावयास लावली. ती प्रतिज्ञा अशी : *यश्चात्र*








*धर्मोनीत्युक्तो दण्डनीतिव्यपाश्रयः । तं अशंकः करिष्यामि स्ववशो न कदाचन ।।* [या ठिकाणी (राज) नीतीत सांगितलेला आणि दण्डनीतीचा आधार असलेला जो धर्म असेल त्याचे निश्चित पालन करीन. (माझ्या) मर्जीप्रमाणे कधीही (वागणार नाही.)]

(*महाभारत*, शान्तिपर्व, ९-१०६-१०८)

जगाला दंड किंवा शिक्षा करणारा राजा स्वतः जर राजधर्म सोडून वागू लागला तर तोही दण्डार्ह होतो असे या पौराणिक कथांवरून दिसते.

समाजाच्या स्वास्थ्यासाठी आणि प्रगती साधण्यास समाजाला मर्यादा पालन करण्यास भाग पाडणारा शास्ता आवश्यक आहे याची जाणीव त्या काळी होती. उच्छृंखलांचे दमन करणारा प्रमुख या दृष्टीने राजाला 'दण्ड' ही संज्ञा होती. शुक्रनीतीत म्हटले आहे : *दमो दण्डः इति ख्यातः, तस्माद् दण्डो महीपतिः ।* (I.१५६) ['दम' (शिक्षा) दंड म्हणून प्रसिद्ध आहे म्हणून राजा ह्यालाही दंड म्हणतात.]

### राजा-ईश्वरी अंश

या प्रजासत्ताक मतप्रवाहाशी समांतर असा राजाला ईश्वरी अंश मानणारा मतप्रवाह ऋग्वेद कालापासून आढळतो. ऋग्वेदात (IV-42) पुरुकुत्साचा मुलगा त्रसद्दस्यू म्हणतो : "मी इंद्र आणि वरुण आहे. मी द्यावापृथिवी आहे. मी अदितीचा पुत्र आहे." *अहं इन्द्रो वरुणस्ते महित्वा उर्वी गभीरे रजसी सुमेके ।* (ऋ. वे. IV-42. 3-4)

मनूनेही राजा ईश्वरी अंश असल्याचे मान्य केले आहे. तो म्हणतो : "इंद्र, अनिल, यम इ. देवतांचे सामर्थ्य एकत्रित करून ब्रह्मदेवाने राजाची निर्मिती केली आहे. म्हणून तो सर्व प्राणिमात्रापेक्षा अधिक तेजस्वी आहे. *यस्माद् एषां सुरेंद्राणां मात्राभ्यो निर्मिता नृपः । तस्माद् अभिभवत्येव सर्वभूतानि तेजसा ।।* (मनुस्मृति, VII.3-4)

नारदस्मृतीमध्ये "राजे लोक अग्नि, इंद्र, सोम, यम आणि कुबेर यांची रूपे धारण करतात म्हणजेच = त्यांची कार्ये आपापल्या राज्यात पार पाडतात (*पञ्चरूपाणि धारयन्ति अमितौजसः*) तर राजा दैवत नाही असे कसे म्हणता येईल? (*कथं राजा न दैवतम्* ।) असे स्मृतिकारांनी विचारले आहे.

चक्रवर्ती राजा विष्णूचा अंश आहे ही समजूत वायुपुराणात दृढमूल झालेली आढळते. ते पुराण म्हणते : *विष्णोरंशेन जायन्ते पृथिव्यां चक्रवर्तिनः ।* [विष्णूच्या अंशानेच चक्रवर्ती सम्राट पृथ्वीवर होतात.]

कौटिल्याने प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यांप्रमाणे राजसंस्थेच्या स्वरूपाची चर्चा केली नाही. त्याने फक्त एके ठिकाणी म्हटले आहे : "मात्स्य न्यायाने त्रस्त झालेल्या लोकांनी वैवस्वत मनूला राजा केले आणि लोकरक्षणाच्या मोबदल्यात त्याला धान्याचा सहावा भाग आणि द्रव्य देण्याचे ठरवले." *मात्स्यन्यायाभिभूताः प्रजां मनुं वैवस्वतं राजानं चक्रिरे । धान्य-षड्भागं पण्य दशभागं हिरण्यं च अस्य भागधेयं प्रकल्पयामासुः । तेन भृतं राजानः प्रजानां योगक्षेमावहाः ।* (*कौटिलीय अर्थशास्त्र*, १.१३-५-६) ['मात्स्य न्यायाने (वळी तो कान पिळी किंवा मोठा मासा हाच माशास गिळतो तसे) पीडित झालेल्या प्रजेने वैवस्वत मनूला राजा केले : धान्याचा सहावा भाग, विक्रेय वस्तूचा दहावा भाग आणि सोने हा त्याचा वाटा असे ठरवून दिले. त्याच्यावर चरितार्थ चालवून राजे लोक प्रजेच्या योगक्षेमाची काळजी वाहतात.']

राजसत्ता हा मानवी करार आहे. त्यात ईश्वरी अंशाचा संबंध नाही असे कौटिल्याचे मत दिसते.

### तत्त्वचर्चेचा अभाव

आपल्यास मान्य करावयास हवे की, पाश्चात्त्य ग्रंथकारांनी राज्यसंस्थेचे स्वरूप कसे असावे अशी, एका दृष्टीने तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्र यांच्याशी संबद्ध असणारी जशी चर्चा केली आहे तशी आपल्याकडे फारशी दिसत नाही. कारण प्राचीन ग्रीसमध्ये मॉनर्की (राजसत्ता), अरिस्टॉक्रसी (उमराव-सत्ता), ऑलिगार्की (कंपूशाही) इ. भिन्न राज्यपद्धती असणारी नगरराज्ये (city-states) होती. तसेच तत्त्वचिंतन, न्याय, सहिष्णुता यावर आधारलेले जीवन हे मनुष्याचे सर्वोच्च ध्येय आहे आणि हे ध्येय साध्य होण्यासाठी कशाप्रकारची राज्यपद्धती आदर्श होईल याचा विचार प्लेटो, अरिस्टॉटल इ. ग्रीक तत्त्ववेत्त्यांनी आणि त्यांच्या नंतरच्या युरोपियन अनुयायांनी केला. भारतात प्रामुख्याने राज्यकारभाराच्या तपशिलाचा विचार केला गेला, कारण हे लेखक कौटिल्याप्रमाणे राज्यकारभाराचा प्रत्यक्ष अनुभव असलेले होते; पंडित वा तत्त्ववेत्ते नव्हते.

भारतीय राजनीतिकार 'राज्य' (स्टेट) या संकल्पनेची तत्त्वचर्चा फारशी करीत नसले तरी 'राज्य' म्हणजे काय, त्याचे महत्त्वाचे घटक कोणते याबद्दल त्यांच्या कल्पना निश्चित आहेत. त्यांच्या मते "राजा, अमात्य, राष्ट्र, दुर्ग, कोश (खजिना),

वल (सैन्य) आणि सुहृत् (दोस्त) ही सात अंगे मिळून राज्य होते." [*स्वामी अमात्यं राष्ट्रं च दुर्गं कोशो वलं सुहृत् । परोपकारीदं सप्तांगं राज्यमुच्यते ।। (अग्निपुराण, २३९.१)*] अग्निपुराणाने येथे राज्य म्हणजे एक शरीर आहे अशी उपपत्ती मांडलेली दिसते. (ऑर्ग्यानिक थिअरी ऑफ द स्टेट.)

**गणराज्ये**

आतापर्यंत आपण राजसत्ताक पद्धतीचा उगम आणि स्वरूप यांचा विचार केला. आता आपण लोकसत्ताक राज्यपद्धतीचा विचार करू.

स्मृतिग्रंथांत उल्लेख नसला तरी त्या काळी राजसत्ताक पद्धतीपेक्षा निराळी – लोकसत्ताक – राज्यपद्धती रूढ होती. त्या पद्धतीच्या राज्यांना गणराज्ये म्हणत. पाणिनीने अष्टाध्यायीत क्षुद्रक, मालव, प्रकण्व[१] इ. गणराज्यांचा उल्लेख केला आहे. महाभारत अंधक-वृष्णी संघाचा उल्लेख करते. कौटिल्याने अर्थशास्त्राच्या ११ व्या अधिकरणात लिच्छिवी, वृजी, मल्ल, मद्र इ. गणांचे उल्लेख केले आहेत. त्यापेक्षा तपशीलवार माहिती *अंगुत्तर निकाय* (I. 213, IV. 252, 258), *दीघनिकाय*, *महावस्तु* (I.34, II.3) इ. बौद्ध ग्रंथांत, आणि *भगवती सूत्र* (सय XV) या जैन ग्रंथातून मिळते. या गणराज्यांची नावे त्यात वसाहत करणाऱ्या जनसमुदायांच्या नावावरून पडली आहेत. उदा., मल्ल, अंग, मालव इ. अलेक्झांडरबरोबर आलेल्या ग्रीक ग्रंथकारांनी या गणराज्यांची आणि तेथील राज्यपद्धती यांची तपशीलवार माहिती दिली आहे. मॅकक्रिंडिलने *Ancient India as described by Megasthenes, Arrian etc.* या पुस्तकात दिलेल्या माहितीवरून काही राज्ये ऑलिगार्की तर काही ॲरिस्टॉक्रसी प्रकारातली होती. सत्ताधारी वर्ग ती ती गणराज्ये स्थापणाऱ्या क्षत्रियांचा म्हणजे त्यांच्या वंशजांचा होता. उदाहरणार्थ – यौधेय नामक प्रबळ गणराज्य होते. त्यात युद्ध, शांतता इ. महत्त्वाच्या प्रश्नांवरील निर्णय ५००० उच्चकुलीन क्षत्रिय घेत. वैशाली हे त्या मानाने वरेच लहान गणराज्य होते. पण तेथील निर्णय ७७०७ 'राजे' घेत. ललित विस्तर या बौद्ध ग्रंथात त्यांची कुचेष्टा करताना ग्रंथकार म्हणतो : *"एकैकः एव मन्यते 'अहंराजः, अहं राजेति ।' "* (प्रत्येक जण 'मी राजा आहे' 'मी राजा आहे' असे मानतो.) लखनौचे व्हिक्टोरियावाले स्वतःला 'नवाव' समजतात तसे. गौतम बुद्ध ज्या शाक्य कुळात जन्मला त्या आणि त्यांच्या शेजारच्या कोलिय जमातीत असेच सार्वजनिक पद्धतीने निर्णय घेतले जात.

कौटिल्याच्या मते सुराष्ट्र, कांवोज इ. गणराज्ये क्षत्रिय आणि वैश्य यांची होती आणि काही, उदाहरणार्थ लिच्छिवि, वृजिक, कुरु, पांचाल – केवळ क्षत्रियांची होती आणि त्यांच्या प्रमुखांना 'राजा' ही पदवी असे. तो म्हणतो : *"काम्वोज – सुराष्ट्र – क्षत्रिय श्रेण्यादयः वार्ताशस्त्रोपजीविनः । लिच्छिविक-वृजिक-मल्लक-भद्रक-कुकुर-कुरु-पाञ्चाला-दयः राजशव्दोपजीवितः ।"* (*कौटिलीय अर्थशास्त्र* XI-1-4-5) .

यातील 'वार्ताशस्त्रोपजीविनः' याचा अर्थ स्पष्ट नाही. शांततेच्या काळात हे लोक कृषी, गोरक्षण, वाणिज्य हा वैश्यव्यवसाय करणारे आणि युद्धकाळात शस्त्र धारण करणारे असा प्रा. कंगले यांनी अर्थ घेतला आहे. पण 'श्रेण्यादयः' बहुवचनामुळे 'वैश्य आणि क्षत्रिय या जमातींची मिळून सुराष्ट्र, कांवोज ही राज्ये असावीत असे दिसते. शिवाय क्षत्रिय हे केवळ आपद्धर्म म्हणून वैश्यवृत्ती स्वीकारतात – शांतता काळात नव्हे. 'राजशव्दोपजीविनः' या पाठाचा अर्थ स्पष्ट नाही. मला वाटते, त्या राज्यांच्या मूळ वसाहतकारांच्या वंशजांना किंवा त्यांच्या प्रमुखांना राजे म्हणत असावेत. ते काही असले तरी या राज्यांत ब्राह्मणांना प्रमुख स्थान नव्हते हे स्पष्ट दिसते.

ह्या गणराज्यांमध्ये सार्वभौम सत्ता आमजनतेकडे म्हणजे त्यांच्या प्रतिनिधिमंडळाकडे (General Assembly) कडे होती.[२] *दीघनिकाय* (II pp. 71-25) या पाली ग्रंथात गौतमवुद्धाने वज्जि (वृजि) या संघराज्यावद्दल म्हटल्याचे नमूद केले आहे. "जोपर्यंत वज्जिसंघातील जनतेच्या वारंवार वैठकी होऊन त्यात सर्वांच्या संमतीने ते निर्णय घेतील आणि जोपर्यंत ते धर्माने आणि न्यायाने वागतील तोपर्यंत त्या राज्याचा उत्कर्ष होईल." 'सर्वांच्या संमतीने' म्हणजे सार्वमत (Referendum) घेऊन वा लोकप्रतिनिधींचे मत अजमावून हे स्पष्ट

---

१ ग्रीक ग्रंथांत यांची नावे अनुक्रमे Oxydrakakai, Melloi, व Parikanior अशी आढळतात.

२ प्राचीन गणराज्यामध्ये मतदारांची प्रचंड संख्या (वैशाली सारख्या छोट्या राज्यात ७००० चे वर) असे. यावरून असे अनुमान वांधता येते की काही वावतीत सार्वमत (रेफरेंडम) घेत असतील. पण राज्यकारभाराच्या गुप्ततेच्या दृष्टीने गणराज्यात सुद्धा लहान गटच राज्यकारभार चालवीत होता.

अनुक्रमणिका

होत नाही. हा मतदानाचा हक्क त्या त्या राज्यांच्या संस्थापकांच्या वंशजांना असावा. त्यामुळे ग्रीक इतिहासकारांनी नमूद केल्याप्रमाणे यौधेय, लिच्छिवि इ. गणांच्या हजारो सभासद असलेल्या आमसभा होत असत. दैनंदिन राज्यकारभार चालवणारे प्रधानमंडळ/कार्यकारी मंडळ होते.

या कार्यकारी मंडळावर निवडलेले लोक घरचे संपन्न, शूर, शस्त्रविद्या आणि शास्त्रे यात पारंगत, प्राज्ञ, आपापल्या कामात अत्यंत उत्साही (कर्मसु महोत्सवान्) असावेत असे म्हटले आहे. मूळ वचन असे : *द्रव्यवन्तश्च शूराश्च शास्त्रज्ञाः शास्त्रपारगाः । कृच्छ्रासु आपत्सु संमूढान् गणाः सन्तारयन्ति च ।।* (*महाभारत*, शांतिपर्व-राजधर्म १०७.२१)

राजकीय सल्लामसलतीत गुप्तपणा राखणे आवश्यक असते. त्यामुळे गणराज्यातील आमजनतेला त्या कळू देणे योग्य नसते. म्हणून गणप्रमुखांनी आपल्या गणाचे कशात हित आहे याचा विचार करून ते कार्य करावे. महाभारतात म्हटले आहे : *न गणाः कृत्स्नशः मंत्रं श्रोतुं अर्हन्ति भारत । गणमुख्यैस्तु संभूय कार्यं गणहितं मिथः ।* (*महाभारत*, शान्तिपर्व-राजधर्म १०७.२४ व २५ अ)

अशा प्रकारच्या तपशीलवार सूचना कौटिल्याने *अर्थशास्त्राच्या* १५ व्या अध्यायातील 'मंत्राधिकार' या ११ व्या प्रकरणात दिल्या आहेत. त्यांचा सारांश पुढीलप्रमाणे आहे : "सर्व कार्याच्या अनुष्ठानाच्या मुळाशी मंत्र (मंत्र्याशी केलेली मसलत) आहे. मसलतीच्या ठिकाण एकांतात, बोलणे बाहेर ऐकू येणार नाही असे असावे. अनधिकृत माणसाला मसलतीचे ठिकाणी मज्जाव असावा. जो गुप्त सल्ला-मसलत फोडेल त्याचा वध करावा. (*उच्छिद्येत मंत्रभेदी । अर्थशास्त्र* XV. II 2-6)

जरूरीचे काम असेल तर मंत्री आणि मंत्रिपरिषद यांची संयुक्त बैठक घ्यावी. त्यात बहुसंख्य व्यक्ती जो सल्ला देतील त्याप्रमाणे अथवा ज्यायोगे कार्य सिद्धीस जाईल तसे करावे. (उपर्युक्त, ५८)

महाभारतकारांनी गणराज्यांचे सामर्थ्य त्यांचे गुप्तहेरखाते, आर्थिक सामर्थ्य आणि धार्मिक व्यवहार यावर अवलंबून आहे असे म्हटले आहे. *चार यंत्र विधानेषु कोशसंनिचयेषु च। नित्ययुक्ता महावाहो वर्धन्ते सर्वतो गणाः ।। धर्मिष्ठान् व्यवहारांश्च स्थापयंत्यश्च शास्त्रतः । यथावत् प्रति पश्यन्तो विवर्धन्ते गणोत्तमाः ।।* (*महाभारत*, शांतिपर्व-राजधर्म १०७.९, १७)

महाभारतात आणि कौटिलीय *अर्थशास्त्रात* गणराज्यांच्या विनाशाची पुढीलप्रमाणे कारणे दिली आहेत : घराण्यांची भाऊवंदकी, पक्षापक्षातील वैमनस्य, भ्रष्टाचार, मंत्रिमंडळातील अंतर्गत कलह, मंत्रभेद (राजकीय सल्लामसलतीची वाच्यता).

महाभारतात (शांतिपर्व-राजधर्म, १०७.२२-३२) भीष्म सांगतात : *भेदमूलो विनाशोहि गणानां उपलक्षये । मंत्रसंकरणं दुःखं बहूनामिति मे मतिः ।। कुलस्य कलहा जाताः, मंत्रवृद्धैरुपेक्षिताः । गोत्रस्य नाशं कुर्वन्ति गणभेदस्य कारकम् ।। भेदाच्चैव प्रादानाच्च भिद्यन्ते रिपुभिर्गणाः ।।*[3] [गणराज्यांचा विनाश त्यांच्या आपापसातील भेदा-भांडणांमुळे होतो. राजकीय सल्लामसलतीत गल्लत झाली तर अनेकांना दुःख भोगावे लागते. वृद्ध मुत्सद्यांनी घरातील भांडणाकडे दुर्लक्ष केले. भेद माजवून आणि लाच देऊन गणराज्ये शत्रूकडून फोडली जातात.] (*महाभारत*, शांतिपर्व-राजधर्म १०७.२१-३२)

हे सर्व जरी खरे असले तरी भीष्मांच्या मते परक्या स्वारीपेक्षा देशांतर्गत वेदिली जास्त धोकादायक आहे :*आभ्यन्तरं भयं रक्ष्यम्, असारं वाह्यतो भयम् । आभ्यन्तरं भयं राजन्, सद्यो मूलानि कृन्तति ।।* (अंतर्गत भयापासून रक्षण करावे. कारण वाहेरून होणारे भय कमजोर असते. हे राजा, अंतर्गत भय (यादवी) राज्याची मुळे तावडतोव कुरतडून टाकतात.) (गणराज्यांचा विनाश त्यांच्या आपांपसातील भेदा(भांडणां)मुळे होतो. राजकीय सल्ला-मसलतीतील गल्लत झालीतर अनेकांना दुःख भोगावे लागते. वृद्ध मुत्सद्यांनी घरातील भांडणाकडे दुर्लक्ष केले भेद माजवून आणि लक्ष्य देऊन गणराज्य शत्रूकडून फोडली जातात.)

गौतम बुद्धाने दिलेला सल्ला वर दिला आहे पण तो मानला गेला नाही. परिणामतः राजा अजातशत्रूच्या सैन्यासमोर पूर्वभारतातील गणराज्यांचा टिकाव लागला नाही आणि अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळी पश्चिमोत्तर भारतातील गणराज्ये नष्ट झाली. आणि ज्या गणराज्यांत पिढीजात संघप्रभुत्व होते त्यांचे राजघराण्यात रूपांतर झाले. अशारीतीने वेदकालापासून चालत आलेली भिन्न प्रकारची गणराज्ये इतिहासजमा झाली.

३. (प्रदान=लाच)

**राज्याची सप्तांगे**

अग्नि, स्कंद इ. पुराणात स्वामी (राजा), अमात्य, राष्ट्र, दुर्ग, कोश, सैन्य आणि सुहृत् ही राज्याची सात अंगे सांगितली आहेत. त्यापैकी 'राजा' या प्रमुख अंगाचा संक्षिप्तपणे विचार झाला आहे. आता उरलेल्या सहा अंगांचा विचार करू. परराष्ट्र धोरणाच्या यशस्वीपणास या अंगांचा महत्त्वाचा भाग असल्यामुळे परराष्ट्र धोरणाच्या अनुषंगाने त्या विभागात यांची चर्चा येईल.

**अमात्य**

राज्यपद्धती कोणतीही असली तरी तिच्यात अमात्यांना किंवा मंत्रिमंडळाला महत्त्वाचे स्थान होते. अमात्यमंडळ हे अर्वाचीन मंत्रिमंडळाचे पूर्वरूप होते. अमात्यांच्या साहाय्यानेच राज्य चालवणे शक्य असते (*सहायसाध्यं राजत्वम्*) असे कौटिल्याने म्हटले आहे. *शुक्रनीती* सांगते : "मनुष्य सर्वज्ञ नसतो. निरनिराळ्या लोकांमध्ये भिन्न भिन्न बुद्धिवैभव असते. म्हणून राजाने राज्याच्या अभिवृद्धीसाठी मंत्रिमंडळ निवडावे. मंत्रिमंडळाशी सल्लामसलत न करता (राज्यकारभार केला) तर राज्याचा निश्चितपणे नाश होईल." (*पुरुषे पुरुषे भिन्नं दृश्यते बुद्धिवैभवम्। न हि तत् सकलं ज्ञातुं नरेण केन शक्यते?।। अतः सहायान् वरेद् राजा राज्याभिवृद्धये। विना प्रकृतिसंमंत्राद् राज्यनाशो भवेद् ध्रुवम्*।। [II]

स्कंद पुराणात मंत्री या अर्थी 'अमात्य', 'सचिव' हे पर्याय वापरले असून, त्यांचा दर्जा दाखविण्यासाठी त्या हुद्यापूर्वी महा – मुख्य – प्रधान – ही विशेषणे लावत. मंत्रिमंडळात सर्वश्रेष्ठ स्थान महामात्य आणि राजपुरोहित किंवा पुरोधा यांचे असे. आणि महामात्य आणि राजपुरोहित यांच्यामध्ये राजपुरोहित अधिक श्रेष्ठ मानला जाई. तो जवळजवळ राजाच्या दर्जाचा आहे असे मानलें जाई. स्कंदपुराण म्हणते :*राजोपजीविनां श्रेष्ठौ राजामात्य पुरोहितौ। तयोः राजसमः पूज्यः पुरोधाः शास्त्रसंमतः*।। (*स्कंद*, II.28.48)

अमात्यांच्या खातेवाटपाची तत्त्वे किंवा प्रथा यावद्दल निश्चित माहिती नाही. मनु, शुक्र यांच्या मते मंत्र्यांची संख्या आटोपशीर – सात किंवा आठ – असावी. मनु म्हणतो : *सचिवान् सप्तचाष्टौ वा कुर्वीत सुपरीक्षितान्*। (ज्यांची चांगली पारख केली आहे असे ७ किंवा ८ सचिव असावे.)

प्रत्येक जिल्ह्याचा किंवा प्रांताचा प्रतिनिधी मंत्रिमंडळात घेतला पाहिजे अशी राजावर सक्ती नव्हती. महाभारत आणि कौटिलीय *अर्थशास्त्र* यांनी मंत्रिमंडळ मोठे असावे असे मत व्यक्त केले आहे. महाभारतकार चारही वर्णांचे मंत्री घ्यावेत पण ते प्रगल्भ, शूर, संपन्न, शुचि (शुद्ध) असे सुपरीक्षत असावेत असे सांगतात. भीष्मांनी ४ ब्राह्मण, १८ क्षत्रिय, २१ वैश्य आणि ३ शूद्र असलेले मंत्रिमंडळ असावे असा सल्ला दिला आहे : *चतुरो ब्राह्मणान् वैद्यान्, प्रगल्भान् स्नातकान् शुचीन्। क्षत्रियान् दशचाष्टौ च बलिनः शस्त्र पाणिनः।। वैश्यान् वित्तेन संपन्नान् एकविंशतिः संख्या। त्रींश्च शूद्रान् विनीतांश्च शुचीन् कर्मणि पूरके*।। (वेदविद्यासंपन्ना, प्रगल्भ, शुद्ध आचरणाचे चार ब्राह्मण, वलवान् शस्त्रविद्यासंपन्न असे १८ क्षत्रिय, धनसंपन्न २१ वैश्य आणमि तीन विनयशील, शुद्ध आचरणाचे कामसू शूद्र असलेले मंत्रिमंडळ असावे.) (*महाभारत*, शान्तिपर्व-राजधर्म ८५.७-८)

या यादीतील प्रत्येक वर्णाची वैशिष्ट्ये ज्यांच्या ठिकाणी प्रकर्षाने आढळतात, अशीच माणसे निवडावीत असे त्यांच्या विशेषणांवरून दिसते. 'मंत्र्यांची निवड पात्रतेवरून करावी, जातीवरून किंवा घराण्यावरून करू नये. फक्त भोजन आणि लग्न यावावतीतच जातीचा विचार करावा असे शुक्राने स्पष्ट सांगितले आहे : *न जात्या न कुलेनैव श्रेष्ठत्वं प्रतिपद्यते। विवहि भोजने नित्यं कुलजाति विवेचनम्*।। (शुक्रनीती II.54)

जय मिळविण्याची इच्छा असलेल्या राजाने सेनापती किंवा सैनिक निवडताना ते शुद्र आहेत का म्लेंछ आहेत का संकर जातीचे आहेत हा विचार न करता, ते स्वामीभक्त, आपापल्या धर्माप्रमाणे वागणारे, आपल्या शत्रूंचा द्वेष करणारे किंवा शत्रूंना सामील नसणारे असावेत. (*स्वधर्म-निरता नित्यं स्वामिभक्त-रिपुद्विषः। शूद्रा वा क्षत्रिया वैश्या म्लेच्छाः संकर संभवाः। सेनाधिपाः सैनिकाश्च कार्या राज्ञाजयार्थिनी*।।)

त्या काळाच्या मानाने हा दृष्टिकोन प्रगतिशील नाही का?

**परराष्ट्र धोरण**

मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने परराष्ट्र धोरण ठरते. तेव्हा येथे परराष्ट्र धोरणाचा विचार करणे औचित्यपूर्ण होईल. परराष्ट्र धोरणाची ही चर्चा १५०० वर्षापूर्वीच्या भारताची आहे. अर्वाचीन काळातील उदाहरण घेतले तर ते सर्व बावतीत लागू पडेल असे नाही. प्रत्येक राष्ट्राची सरहद्द दुसऱ्या राष्ट्रांच्या सीमांना लागून असते त्यामुळे प्रत्येक राष्ट्राला आपल्या परिस्थितीप्रमाणे व कुवतीप्रमाणे आपले धोरण ठरवावे लागते. पूर्वी 'राष्ट्र' शब्द राज्याचा








एक भाग किंवा एक अंग म्हणून वापरत. राज्य म्हणजे पराराष्ट्र धोरणाच्या दृष्टीने जास्तीत जास्त मित्रराष्ट्रांचे सहकार्य असणे जरूर असते. पण राजकारणात कुणी कुणाचा मित्र नसतो अगर शत्रू नसतो. शत्रुत्व किंवा मैत्री राष्ट्रहित ठरवते. कामंदकाने म्हटले आहे : *कारणेन हि जायन्ते मित्राणि रिपवस्तथा* । (कामन्दकनीतिसार, VIII.52)

परराष्ट्र धोरणाविषयी त्या काळी मांडलेले सिद्धान्त – राज मण्डल, षड्गुण्य पद्धती – आजही विचार करण्यासारख्या आहेत. हे सिद्धान्त कौटिलीय *अर्थशास्त्र* (VI.2 आणि VII), *मनुस्मृती* (VII.154-210), *याज्ञवल्क्य स्मृती* (I.345-348), *अग्निपुराण* (२३३, २४० अध्याय), *नीतिवाक्यामृत* (३१७-३४३) इ. ग्रंथांत मांडले आहेत. यापैकी *नीतिवाक्यामृताने* कौटिल्याचेच मत मांडले आहे. यात महत्त्वाचा ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्र. त्यावेळी राजसत्ता दृढमूल झाल्यामुळे राजसत्ता डोळ्यासमोर ठेवून हा ग्रंथ लिहिला गेला आहे. त्यामुळे राजा हा सत्तेचे केंद्रस्थान होता. 'राजा' या संज्ञेचा अर्थ 'विजिगीषु राजा' किंवा नुसता 'विजिगीषु'. 'विजिगीषु' कोण हे सांगताना कामंदक म्हणतो : "जो प्रकृतींचे बाबतीत म्हणजे राज्याच्या कोश, दंड इ. अंगांच्या बाबतीत संपन्न असतो, अत्यंत उत्साही, परिश्रम करणारा असतो आणि ज्याला विजयाची नैसर्गिक महत्त्वाकांक्षा असते त्याला 'विजिगीषु' म्हणतात. *संपन्नस्तु प्रकृतिभिः महोत्साहः कृतश्रमः । जेतुमेषणशीलश्च विजिगीषुरिति स्मृतः ।। (कामन्दक VIII-6)*

"राजकारण जाणणारा (नयज्ञः) राज्याच्या अंगरूपी संपत्तीने (प्रकृती) युक्त असेल तर अशा राजाचे राज्य लहान असले तरी तो आपले राज्य कमी होऊ देत नाही; इतकेच नव्हे तर, सर्व पृथिवी जिंकतो" असे कौटिल्याने सांगितले आहे. *आत्मवान् स्वल्पदेशोऽपि युक्तः प्रकृतिसंपदा । नयज्ञः पृथिवीं कृत्स्नां जयत्येव न हीयते ।।* (*कौटिलीय अर्थशास्त्र* ६.१.१८)

कौटिल्याने हा श्लोक अवतरण म्हणून घेतला आहे त्यावरून हे मत त्याच्यापूर्वी रूढ होते असे दिसते.

(२) परराष्ट्र धोरणाच्या चर्चेत दुसरी संज्ञा 'अरि' (= शत्रू). राज्याभोवती सीमेला सीमा लागून असलेले प्रत्यक्ष किंवा भावी शत्रू (राज्य). ते एक असतील किंवा अनेक असतील. त्यांनी युद्ध पुकारलेले असेल किंवा नसेलसुद्धा, पण सीमेला सीमा लागून असणाऱ्या राज्यांना (राष्ट्रांना) 'अरि' म्हटले आहे. पण नीतिवाक्यामृतकारांनी, अरित्व किंवा शत्रुत्व हे भौगोलिक स्थानावर अवलंबून नसते; त्या त्या राजांच्या हेतूवर, धोरणावर किंवा उद्देशावर अवलंबून असते असे म्हटले आहे. (*कार्यं मित्रत्वामित्रत्वयोः कारणं न पुनः त्रिप्रकर्ष-संनिकर्षौ* । नीतिवाक्यांमृत – षाड्गुण्या पृ. १२१) कौटिल्य अमित्र किंवा शत्रू कोण ही व्याख्या देऊन थांबत नाही त्याचा बंदोबस्त कसा करावा हे सांगतो. शत्रूंचे किंवा अरींचे वर्गीकरण करताना तो म्हणतो :

(i) अरि संकटात सापडला तर त्याच्यावर चालून जाण्यास योग्य तो *यातव्य*. (ii) ज्याला दुर्ग किंवा मित्र यांचा आश्रय नाही किंवा ज्याचा आश्रय दुर्बल आहे असा 'अरी' *उच्छेदनीय* (समूळ नाहीसा करण्यास योग्य) (iii) जर अरीला बलवान आश्रय असेल तर तो *पीडनीय* (त्रास देण्यास योग्य) किंवा *लीव/शास्त्र/कर्शनीय* (दुर्बळ करण्यास योग्य) असतो. (*कौटअर्थ* ६.२.१७) याज्ञवल्क्य-स्मृति (१.३४५) वरील 'मिताक्षरा' टीकेत असेच वर्गीकरण आहे.

(३) तिसरी संज्ञा 'पार्ष्णिग्राह' म्हणजे 'पिछाडीचा शत्रू'. विजिगीषु (राजा) मोहिमेवर गेला असता किंवा मोहिमेवर निघण्याच्या वेळी राज्याला उपद्रव करणारा. *यो विजिगीषौ प्रस्थितेऽपि प्रतिष्ठानमाने वा पश्चात् कोपं जनयति स पार्ष्णिग्राहः* । (नीतिवाक्यामृत पृ. ३१९)

(४) मध्यस्थ : अरी आणि विजिगीषु यांच्या राज्यांना राज्य लागून असणारा पण अरि आणि विजिगीषु एकत्र झाले असता किंवा एक झाले नसता त्यांना मदत करण्यास समर्थ अन् अरि आणि विजिगीषु या दोघांनी एकत्र होऊन चढाई केली असता त्यांचे दमन करण्यास समर्थ असलेला राजा. अरि-*विजिगिष्योः भूम्यन्तरः, संहत–असंहतयोः अनुग्रह समर्थः, विग्रहे वा असंहतयोः* । (*कौट. अर्थशास्त्र* ६.२.२)

(५) उदासीन : 'उदासीन' म्हणजे विजिगीषु, अरि आणि मध्यस्थ यांच्या राज्यांच्या बाहेर असलेल्या, वर उल्लेखलेल्या राज्यांच्या प्रकृतीपेक्षा (राज्याच्या अंगापेक्षा) अधिक बलवान असलेला, ते तिघे एकत्र आले असताना किंवा नसताना त्यांना मदत करण्यास समर्थ आणि त्या तिघांची एकजूट झाली तर तिघांचेही दमन करण्यास समर्थ. उदाहरणार्थ, आजच्या जागतिक परिस्थितीतील युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका. कौटिल्य म्हणतो : "*अरि-विजिगीषु मध्यानां बहिः, प्रकृतिभ्यो बलवत्तरः संहत-असंहतानां अरि विजिगीषुमध्यमानां*

*अनुग्रहसमर्थः निग्रहे च संहतानामुदासीनः* । (कौट. अर्थ. VI.2.22)

**परराष्ट्र धोरण – काल आणि आज**

प्राचीन ग्रंथांच्या आधारे मी जे विवेचन करीत आहे ते आपल्या दृष्टीने उद्‌बोधक आहे. मी याआधी कामंदकाने दिलेल्या विजिगीषु राजाच्या व्याख्येतील दोन महत्त्वाच्या लक्षणांत आपण कमी पडतो. ती लक्षणे म्हणजे *'संपन्नस्तु प्रकृतिभिः'* (अमात्य दुर्ग इत्यादींनी संपन्न आणि *'जेतुं एषणशीलस्य'*. (जिंकण्याची महत्त्वाकांक्षा असलेला) यापैकी प्रकृति म्हणजे अमात्य, राष्ट्र, दुर्ग, कोश, बल आणि सुहृत्. अस्थिर मंत्रिमंडळामुळे आम्ही मंत्रशक्तीत (Statecraft मध्ये) कमी पडलो. आमचे सैन्यबळ चांगले मजबूत असूनही आम्हांला इतक्या वर्षांत ईशान्य आणि वायव्य प्रान्तात शांतता प्रस्थापित करता आली नाही, कारण आपले मंत्रबळ कमी पडले.

राष्ट्र म्हणजे भूप्रदेश. स्वातंत्र्यप्राप्तीच्या वेळी आपल्या वाटणीला आलेल्या प्रदेशापैकी काही प्रदेश आम्ही गमावला आहे. पण तो परत मिळवू शकलो नाही हा आपण मंत्रबळात कमी पडल्याचा पुरावा नाही का? भारतीय सैनिक शूर आहेत हे शत्रूदेखील मान्य करतात. दुसऱ्या महायुद्धात भारतीय सैन्याने रणांगण गाजवले. पण त्या सैन्याला १९६२ मध्ये कमीपणा आला हे आपले मंत्रबळ कमी पडल्याचे चिन्ह आहे.

तीच गोष्ट कोशाची – आर्थिक मजबुतीची. दुसऱ्या महायुद्धात उद्‌ध्वस्त झालेली जर्मनी, जपानसारखी राष्ट्रे ४० वर्षांत आर्थिकदृष्ट्या अमेरिकेला आव्हान देण्याइतपत प्रबळ होतात आणि आपल्याला, दुसऱ्या महायुद्धातील विध्वंसाची फारशी झळ पोचली नसतानासुद्धा आपण कमालीचे कर्जबाजारी झालो आहोत.

दंडशक्तीपेक्षा मंत्रशक्ती प्रबळ असते हे प्राचीन भारतीयांचे मत विचार करण्यासारखे आहे असे मला वाटते.

**परराष्ट्र-धोरण : मंडल-सिद्धान्त**

कालाचा संदर्भ बदलला म्हणजे प्राचीन विचारवंतांची मते वा सिद्धान्त कसे बदलावे लागतात याचे उदाहरण म्हणजे कौटिल्याचा मंडल सिद्धान्त. कौटिल्याने राज्यांच्या भौगोलिक स्थानावरून व्यवहारज्ञानावर आधारलेला हा सिद्धान्त आहे. त्याच्या मते सीमेला सीमा लागून असणाऱ्या राज्यांत स्पर्धा वा वैर असणे स्वाभाविक असते हे त्याचे पहिले गृहीतकृत्य आणि दुसरे गृहीतकृत्य शत्रूचा जो शत्रू तो आपला मित्र. कौटिल्याने (१) विजिगीषु राजा हा मध्य कल्पून (२) त्याचा शेजारी असणारा राजा त्याचा शत्रू आणि त्याच्या शत्रूच्या पलीकडील राजा हा शत्रूचा शत्रू म्हणजे विजिगीषु राजाचा मित्र, असे एकापलीकडे एक असे सहा राजे घेतले आहेत. तसेच विजिगीषु राजाच्या (राज्याच्या) पिछाडीस असलेला – 'पार्ष्णिग्राही' – शत्रू असून त्याच्या पलीकडे असणारा विजिगीषु राजाचा मित्र, असे सहा राजे अनुक्रमे शत्रू-मित्र मानले आहेत. कौटिल्याने विजिगीषु-राजाच्या पुढे आणि मागे असे बारा राजांचे राजमंडल कल्पिले आहे. व्यवहारात असे आढळत नाही. सीमेला सीमा असणारी राज्ये (राजे) मित्र असू शकतात.

कौटिल्याने राजमंडलाची मांडणी दुसऱ्या प्रकारानेपण केली आहे ती अशी : (१) विजिगीषु राजा – त्याचा मित्र - त्याच्या मित्राचा मित्र, (२) शत्रू – शत्रूचा मित्र – त्याच्या मित्राचा मित्र, (३) मध्यस्थ – त्याचा मित्र – त्याच्या मित्राचा मित्र, (४) उदासीन – उदासीनाचा मित्र – त्याच्या मित्राचा मित्र

**षाड्‌गुण्य**

बातव्याधी या कौटिल्यपूर्व आचार्याने विजिगीषु राजा प्रबळ होण्यासाठी (१) संधी आणि (२) विग्रह असे द११नच उपाय किंवा गुण मानले आहेत. संधी म्हणजे काही अटींवर केलेला समझोता किंवा तह आणि (४) विग्रह म्हणजे युद्ध. तो म्हणतो : संधि-विग्रहाभ्यां षाड्‌गुण्यं संपद्यते। (संधी (तह) आणि युद्ध यांनी षाड्‌गुण्य साधते.)

षाड्‌गुण्य म्हणजे परराष्ट्र व्यवहारात उपयुक्त असणारे सहा गुण किंवा उपाय. हे सहा गुण किंवा उपाय पुढीलप्रमाणे आहेत : (१) *संधी* (तह करणे), (२) *विग्रह* (युद्ध करणे), (३) *आसन* (स्वस्थ राहणे), (४) *यान* (चढाई करणे), (५) संश्रय (आश्रयाला जाणे), (६) *द्वैधीभाव* (एकाशी तह करून दुसऱ्याशी युद्ध पुकारणे). परिस्थितीच्या भेदामुळे (*अवस्थाभेदात्*) हे प्रकार भिन्न आहेत असे कौटिल्याने म्हटले आहे. ह्या षाड्‌गुण्याचे उल्लेख पुराणग्रंथातही आढळतात. उदाहरणार्थ, स्कंदपुराणाच्या काशीखंडात (IV.44.68) राजा दिवोदास षाड्‌गुण्यात सर्वश्रेष्ठ तज्ज्ञ होता असे म्हटले आहे. संधि-विग्रह-यानास्ति (*अस्ति=आसन) संश्रयं द्वैतभावनम्* । *यथा स राजा संवेत्ति न तथा अत्रापि कश्चन* ।। (संधी, विग्रह, आसन,






संश्रय इत्यादी मध्ये तो इतका तज्ञ होता तसा अद्याप झाला नाही.)

कौटिल्याने परराष्ट्र व्यवहाराची चर्चा (अधिकरण ७ मधील ९८ प्रकरणापासून प्रकरण १२६ – कंगले मराठी अनुवाद, पृ. १७२ ते ४५५) पुढे विग्रह (युद्ध) विषयक प्रकरणे (१३५ ते १५९ – कंगले अनुवाद, पृ. ४८२-५४१), संघराज्यावद्दल धोरण (प्रकरणे १६०-६१) आणि वलहीन राजाविपयी (प्रकरणे १६२-१७० – कंगले अनुवाद, पृ. ५४२-५६१) अशी तपशीलवार चर्चा केली आहे. तो विषय इतका मोठा आहे की तो एका लेखमालेचा विषय होईल.

कौटिल्याच्या षाड्गुण्यविषयक विवेचनाचा सारांश सूत्ररूपाने असा सांगता येईल :

१. **संधी** : षाड्गुण्यातील पहिला गुण 'संधी'. दुर्वल राजाला संधी (तह) करणे आवश्यक असते. संधीच्या अटीत काही सैन्य प्रबळ राजाच्या दिमतीला द्यावे अशी अट असेल तर तो 'दण्डोपनत' संधी होय. तहात खंडणी देण्याचे ठरले असेल तर तो 'कोशोपनत' संधी आणि दुर्वळ राजाने आपला काही मुलुख तोडून दिल्यास त्याला 'देशोपनत संधी' म्हणतात. कौटिल्याच्या मते तहाच्या अटी पाळण्यात चुकारपणा करणे किंवा तह मोडण्याचा प्रयत्न करणे राजमान्य आहे आणि कौटिल्याची त्याला संमती आहे. राजपुत्राला ओलीस ठेवल्यास त्या राजपुत्राने निसटून कसे जावे यावद्दल कौटिल्याने मार्गदर्शन केले आहे.

२. **विग्रह** : परराष्ट्र धोरणाचा पाया लष्करी सामर्थ्य आहे असा त्रिकालावाधित सिद्धान्त आहे. यासाठी कौटिल्याने युद्धविषयक स्वतंत्र अधिकरण (प्रकरण १४७ ते १५९) दिले आहे. आता युद्धशास्त्र इतके प्रगत झाले आहे की, त्या काळच्या तपशीलवार सूचना आता कालवाह्य झाल्या आहेत. पण त्या काळी कौटिल्याने राजकारणाचा एक भाग म्हणून युद्धशास्त्राचा किती सखोल विचार केला होता याचा ते प्रकरण म्हणजे पुरावा आहे. तथापि त्याचा आजही मानण्याजोगा सल्ला म्हणजे इतर उपाय शक्य असतील तर युद्ध टाळावे. शत्रुसेनेचा नाश करण्यासाठी त्याने औषधी, मंत्र इत्यादींचा प्रयोग करणे, गूढ पुरुपाकडून वध करविणे इ. वाममार्ग सांगितले आहेत. पण प्राचीन कालापासून आतापर्यंत सर्व राजकारणी लोक हे उपाय राजकारणात वापरत आले आहेत. त्यामुळे यावावतीत कौटिल्याला दोप देण्यात अर्थ नाही.

मॅकिआव्हेलीने *Prince* (Discourses III, ४१ यामध्ये म्हटले आहे : 'For where the safety of the country is concerned depends upon the resolution to be taken, no consideration of justice or injustice, humanity or cruelty should be allowed to prevail... But putting all other considerations aside, the only question should be 'what course will save the life and liberty of the country.' "

छोट्या छोट्या राज्यांनी तुकडे झालेल्या इटली प्रदेशाची प्रवळ राष्ट्र म्हणून मॅकिआव्हेलीला वांधणी करावयाची होती म्हणून प्रत्यक्ष व्यावहारिक राजकारणात वावरलेल्या त्या ग्रंथकाराने हा सल्ला दिला आहे. भारतात प्रवळ मध्यवर्ती सत्ता निर्माण करण्यासाठी कौटिल्याने कठोर विवेचन केले आहे हे लक्षात येईल. स्वतःच्या खासगी जीवनात कटाक्षाने नीतिनियम पाळणारी ही माणसे देशाच्या हितासाठी राजकारणात अशीच वागतात.

३. **आसन** : षाड्गुण्यातील तिसरा गुण 'आसन'. 'आसन' म्हणजे वसणे, वाट पाहणे. शत्रू दुर्वल होईल अथवा संकटात सापडेल याची वाट पाहत आपले वल वाढवत जाणे. सामान्यतः शत्रूशी संधी करूनच या उपायाचा अवलंव करावयाचा असतो.

४. **यान** : चौथा गुण 'यान' म्हणजे शत्रूवर चाल करून जाणे. विग्रहाचा अवलंव केल्यावर हे आवश्यक असते. पण संधी करून चढाई (यान) करणे याला 'संधाय यान' म्हणतात. हे विश्वासघाताचे कृत्य असले तरी प्रत्यक्षात या घटना घडत असल्यामुळे राजनीतीत याची दखल घेतली आहे. इतर राजांच्या बरोवर करार करून त्यांच्या साह्याने शत्रूवर चाल करणे याला 'संभूययान' असे म्हणतात. विजिगीषु राजाने विजय मिळताच मदतनीसाशी केलेले करार पाळावेत. राजाने करार न पाळल्यास इतर राजांनी काय करावे याचेही दिग्दर्शन कौटिल्य करतो.

५. **संश्रय** : 'संश्रय' म्हणजे आश्रय. वलवान शत्रूने हल्ला केल्यास आपण एखाद्या प्रवळ राजाचा आश्रय घ्यावा,

पण असे करताना त्याचे मांडलिकत्व न पत्करण्याची दक्षता घ्यावी. स्वर्गीय इंदिरा गांधींनी अमेरिकेकडून धोका निर्माण होईल हे ओळखून रशियाशी परस्पर-सहकार्याचा केलेला करार हे त्याचे एक अर्वाचीन उदाहरण आहे.

६. **द्वैधीभाव** : पण संश्रयापेक्षा 'द्वैधीभाव' हा शेवटचा गुण अधिक श्रेयस्कर. 'द्वैधीभाव' म्हणजे संधी आणि विग्रह यांचा एकाच वेळी अवलंब करणे. एका किंवा अनेक राजांच्या कडून द्रव्याची किंवा सैन्याची मदत घ्यायची आणि दुसऱ्या बरोबरीच्या विग्रहात त्यांचा उपयोग करून घ्यावयाचा हे ह्या धोरणाचे स्वरूप आहे.

### आणखी काही उपाय

महाभारतात आणि पुराणात साम, दाम, दण्ड आणि भेद हे उपाय सांगितले आहेत. त्यांचा उपयोग करताना पहिला उपाय फलप्रद न झाल्यास दुसरा उपाय करावयाचा असतो आणि ही उपाययोजना करताना देश आणि काळ यांचे भान राखणे आवश्यक असते. यापैकी साम हा उपाय आर्य, गुणवान लोकांच्या बावतीत उपयुक्त ठरतो. दान लोभी लोकांशी व्यवहार करताना, दुष्ट लोकांचे दमन करण्यासाठी दण्ड, उपयोगात आणावयाचा आणि संशयास्पद वृत्तीच्या राजांशी व्यवहार करताना भेद वापरावयाचा असतो. स्कंदपुराणामध्ये म्हटले आहे :

*साम दानं च भेदश्च चतुर्थो दण्ड एव च।*
*नीतौ क्रमात् प्रयोज्याश्च देशकाल विशेषतः।।*
*तत्र साम प्रयोक्तव्यं आर्येषु गुणवत्सु च।*
*दानं लुब्धेषु भेदश्च शंकितेष्विति निश्चयः।।*
*दण्डश्चापि प्रयोक्तव्यः नित्यकालं दुरात्मसु।।*
*(स्कंद, माहेश्वर-कौमारिका खण्ड १६.३९-४१)*

### समारोप

आतापर्यंत आपण पुराणकालीन राज्यव्यवहाराचा विचार करताना राज्यसत्तेची आवश्यकता संरक्षणाच्या गरजेतून निर्माण झाली हे पाहिले. राज्यपद्धतीने व्यक्तिप्रधान किंवा राजसत्ताक आणि प्रजासत्ताक वा गणराज्य अशी दोन रूपे – प्रवाह म्हणा हवे तर – धारण केली. या दोन्ही राज्यपद्धती वेदकालापासून अलेक्झांडरच्या काळापर्यंत चालू होत्या. राजसत्ताक पद्धती ही एक प्रकारच्या सामाजिक करारातून निर्माण झाली. पुराणकारांनी आणि स्मृतिकारांनी ती ईश्वरनिर्मित आहे असा भास निर्माण करण्याचा प्रयत्न केला. आपल्याकडील राजनीतिज्ञ प्रत्यक्ष राज्यकारभाराशी संलग्न होते त्यामुळे त्यांनी तात्त्विक चर्चेवर भर न देता राज्यकारभार कसा करावा, परराष्ट्र धोरण कसे आखावे इ. व्यावहारिक चर्चा केली. युरोपीय राज्यशास्त्र चर्चेचा उगम ग्रीक नगर-राज्ये (city states) कशी असावीत या तत्त्वचर्चेतून होऊन राज्यशास्त्रही तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र यांच्याशी संलग्न झाल्यासारखे दिसते. पुराणकाला-नंतर १५०० वर्षे लोटल्यामुळे काळाचा संदर्भ बदलला. जुने युद्धशास्त्र (ज्यात बल आणि दुर्ग या अंगांचा समावेश होतो) आता कालबाह्य झाले. तथापि परराष्ट्र धोरणाच्या दृष्टीने सामदामादि उपाय, षाड्गुण्य, मंत्रशक्तीचे (state craft) महत्त्व इ. अनेक बावतीत आज आपल्याला शिकण्यासारखे पुष्कळ आहे. इतिहास हा एक श्रेष्ठ शिक्षक आहे. बदलत्या परिस्थितीनुरूप त्याच्या अनुभवसिद्ध ज्ञानाचे आचरण करण्यात राष्ट्रोद्धार आहे.










# अक्षरवेध

**शारदा संगीत** – प्रकाश नारायण संत. मौज प्रकाशन गृह, मुंबई. १९९७; १०० रुपये.

१९९४ साली संतांच्या 'वनवास' या तेरा कथांच्या संग्रहाने रसिकांचे लक्ष वेधून घेतलं होतं. 'त्यात लंपन या संवेदनाशील कुमाराच्या नव्या कोऱ्या मनाला भिडणारे अनुभव आहेत. त्यात अतिसूक्ष्म संवेदनांची धावती वलये उमटली आहेत.' त्याच लंपनच्या घरावाहेरील विश्वाचा थोडासा पुढचा भाग *शारदा संगीत* संग्रहातील पाच दीर्घकथांत आहे.

लंपन अजून ताण-तणाव असलेल्या पौगण्डावस्थेत आहे. अजून आई-वडिलांपासून दूर आजोबा-आर्जीकडे कानडी-मराठी मुलखात शिकत आहे. ह्या दीर्घकथा म्हणजे त्याने निवेदन केलेले त्याचे अनुभव. कधी निवेदने संस्मरणे होतात, कधी स्वगते होतात. लंपन फारसा गुंतत नाही, भावविवश होत नाही, भाष्य करीत नाही. मोजक्या तपशिलांतून घटना, व्यक्ती, वातावरण ही विलक्षण सहजतेने उभी राहतात.

लंपन हा शब्द इंग्रजी (lumpen) मानला तर त्याचा अर्थ स्वजनापासून दुरावलेला, प्रतिष्ठा गमावलेला, तुटलेला असा होतो. अशा लंपनच्या भावस्थितीचं ओझरते दर्शन संस्मरणातून घडते.

'परचक्र' कथेत, आलेल्या पाहुण्यांमुळे लंपन प्रारंभी खूष होतो. पण लवकरच त्यांची थापेवाजी, उचलेगिरी, धूर्तता उघड होते. त्यातून लंपन काही शिकत वाढत असावा. 'आगगाडीच्या रुळांवर' – मध्ये लंपनच्या आठवणी स्टेशन, रूळ, गेटमन, तिथला बाजार, प्रेमिकांचे गाडीतून पलायन यांच्याशी निगडित आहेत. तर 'रानीका बाग' कथेत खेळाची मैदाने, तिथले खेळ, गुंड पोरांची दादागिरी याभोवती आठवणी विणलेल्या आहेत. 'घसरगुंडी' कथा पोरांचा चोरशिपाई खेळ, काजूवियांचा खेळ, इस्पिट (पत्ते) खेळणे, जुगार यावद्दल असली तरी मुख्यतः ती घसरगुंडीवर वेळी-अवेळी पावसात, चांदण्यात, उन्हात खेळण्यावद्दलच्या धुंद, काव्यात्म अनुभवावद्दल आहेत. 'शारदा संगीत' ही कथा म्हणजे तरल कल्पनांनी आणि नर्मविनोदांनी भरलेले अतिशय प्रसन्न अनुभव आहे. विद्यालयाचे प्रेमळ म्हापसेकर मास्तर, विद्यार्थी म्हणून संगीत शिकायला आलेला साठीचा गोड स्वभावाचा निवृत्त अधिकारी, शिकायला आलेल्या पोरी आणि पोरे ही सारीच लोभसवाणी माणसं आहेत.

लंपनला भेटलेली वरीच माणसे आपण सहसा विसरणार नाही अशी आहेत. जिलबी देतो म्हणून सांगून काहीही न देणारे कुरसुंदीकर अण्णा, मंत्र आणि परिकथा यांनी लंपनला इंप्रेस करू वघणारा त्यांचा थापाड्या मुलगा वंक्या, नुसत्या भुवयांनी 'वात्रट पोरांना दावात ठेवणारी' त्याची वहीण हिरा, नटांना मार देत नाटक वसवणाऱ्या मास्तरांना फैलावर घेणारे फारकूचे मामा, लंपनची रेल्वेशी ओळख करून देणारा गेटमन रामगुंडी, लंपनमध्ये हळुवारपणे संगीताची आवड निर्माण करणारी कॉलेजकन्या कुसुम, लंपनला आपल्या चतुर वोलांनी आणि प्रेमळ वागण्यांनी छान वाटायला लावणाऱ्या विद्यालयाच्या विद्यार्थिनी, लंपनला समजून घेऊन त्याच्या पाठीशी सतत राहणारे आजोबा आणि आजी ही सारी माणसं त्याचं जीवन समृद्ध करतात.

लंपन काही जिवांच्या दुःखांना साक्षीदार आहे. दारुड्या नवऱ्याला आणि सासऱ्याला वैतागून गाडीखाली जीव देणारी भाजीवाली शेवंता. (लंपनने तिला वाचायला पुस्तके चोरून दिलेली असतात) तेव्हापासून लंपन रुळावरून स्टेशनकडे जाईनासा होतो. त्याला आजी सांगते, 'एकेकाचे नशीव असतं वावा.' असंच नशीव वसुधा नावाच्या मुलीच्या वाट्याला येतं. तिचं पेटीवादन ऐकून लंपनच्या छातीत आनंदाच्या की काय लाटा भरल्या होत्या. चांदीचा रुपया रस्त्यावर पडल्यावर येतो तसा तिचा आवाज होता. तिला लग्नात विद्यालयानं पेटी भेट दिली होती. तिच्या घरच्या गड्यानं ती परत आणली. तिची मैत्रीण लंपनला म्हणते, 'आम्हा मुलींचं असं असतं वघ.' ऐटदारपणे क्रिकेट खेळणारा पोरगा झोपडीत लाल लंगोट लावून राहतो हे पाहून लंपनला कुणाशीच वोलावेसे

वाटत नाही. लंपनला असं सामाजिक भान येतं हे सुचवले जाते. हे संग्रहाची गुणवत्ता वाढवणारं सूत्र आहे.

कानडी-मराठीतील भाषेचा वापर आपल्या ज्ञानात 'वेष्टपैकी भर घालतो' 'छान वाटायला लावतो.' 'करायला लागलो' ऐवजी 'करायलोय' असे गोड रूप आहे. 'मॅड'चा उपयोग नाना संदर्भात केला आहे तो परिणामकारक आहे. 'त्यानं कारवारी भाषेत लांब पट्टा फिरवला.' 'इंजिनखाली रूळ. खाली धरतीमाता की काय. तिच्याबद्दल बोलायचं कामच नाही.' 'पाय मोडून टाकला नाही तर माझं नाव हे नाही, ते नाही.' 'सगळा बट्टा पोरखेळ करून सोडला की हो!' 'बाहेर पडावं लागलं तडकाफडकी की कसं ते.' हे काही नमुने. तेराशे पक्षी, एक हजार चाफ्याची फुलं, एकेचाळीस फोटो अशा ठाम संख्येत बोलण्याची सवय गमतीदार वाटते.

लंपनची कल्पनाशक्ती तरल आहे. गाडीतून दिसणारा भुईकोट किल्ला म्हणजे उलटी ठेवलेली काळी टोपी. वसुधेची पेटीवर चालणारी बोटे म्हणजे खोडावर तुरुतुरु चालणाऱ्या मुंगळ्या. केदार, यमन, बिहारी राग वाजवताना, ऐकताना केशरी चंद्रबिंब, हिरवी पोपटी वनराई, सोनेरी उन्हात उडणारे रंगीबेरंगी पक्षी यांचे भास होतात. स्टेशनवरील आवाजाच्या भिंतीत सापडून आपण चेंगरून जाऊ, असे भय त्याला वाटते. मात्र काही कल्पना प्रौढ माणसाच्या वाटाव्या अशा, सांकेतिक आहेत. 'धारा बाळाच्या बोटांएवढ्या' 'रुळांना भिडणाऱ्या वाटा रुळांच्या बरगड्या.' 'लवकर मारामारी झाली तर शांततेची शक्यता.' 'शिव्या ऐकून कुणाला वाटलं असतं की, गेलेली अब्रू काय ती परत आणण्याचा तो एकच मार्ग आहे. असेलही. असणारच.' (वाक्यही न पेलणारं)

चतुर बोलणं ठायी ठायी. शेजारीण लंपनच्या आईस पाहुण्या पोराबद्दल विचारते – 'हे कुठलं कलम आलं हो तुमच्याकडे?'

विद्यालयातील संगीत शिकायला आलेली चिमुरडी पोरगी आपल्या जागेवर बसलेल्या वृद्ध वर्गमित्र जमखंडीकरांची टोपी काढून दूर ठेवते आणि त्यांना म्हणते – 'ती बघा तुमची टोपी. तिच्या खाली जाऊन बसा.'

अनुभव आणि शैली यांची एकात्मता विलक्षण की काय म्हणतात ती सगळ्या पुस्तकभर भरभरून राहिली आहे. मुलांनी पुस्तक वाचावं आपल्या तरल भावना, कल्पना शब्दांत कशा पकडता येतात ते पाहण्यासाठी. प्रौढांनी वाचावं आपलं हरवलेलं बाल्य मिळवण्यासाठी आणि कुमारांचं भावविश्व समजून घेण्यासाठी. पुस्तकाला असं शैक्षणिक, साहित्यिक आणि भावनिक मोल आहे.

पुस्तकाच्या वाचनानं वेडी झालेली, पुन्हा पुन्हा वाचणारी, त्यातली वाक्ये उद्धृत करणारी कुमार वयातली मुले प्रस्तुत लेखकाने पाहिलेली आहेत.

***आ.ना. पेडणेकर***

---

**लेखक-परिचय**

❖ **रत्नाकर बापूराव मंचरकर** : एम.ए., पीच.डी., प्रपाठक व प्रमुख, मराठी विभाग, महिला महाविद्यालय, अहमदनगर. मध्ययुगीन मराठी वाङ्मय, एकोणिसाव्या शतकातील वाङ्मय, नवे वाङ्मयीन प्रवाह, तौलनिक साहित्याभ्यास इत्यादी विषयांवर स्वतंत्र ग्रंथ व शोधनिबंध प्रसिद्ध. **पत्ताः** चौधरी बिल्डिंग, शीलाविहार शेजारी, वसंत टेकडीजवळ अहमदनगर ४१४ ००१.

❖ **मुकुंद सदाशिव गोखले** : बी.ए. (गणित), एम.ए. (स्टॅटिस्टिक्स); फेलो, इकॉनॉमिक डेव्हलपमेंट इंस्टिट्यूट, विश्व बँक वॉशिंग्टन, व युनायटेड नेशन्स डेव्हलपमेंट प्रोग्रॅम; राज्य व केंद्र सरकारांतील विविध खात्यांमध्ये विविध हुद्द्यांवर कार्य संयुक्त राष्ट्रसंघ सल्लागार; *संक्षिप्त ज्ञानेश्वरी* (१९९०). **पत्ता** : १०१ दीक्षित सहनिवास, ४७/२४ चिपळूणकर रस्ता, एरंडवन, पुणे ४११ ००४.

❖ **ग.वा. तगारे** : सेवानिवृत्त प्राध्यापक व शिक्षणाधिकारी, महाराष्ट्र शिक्षण सेवा, महाराष्ट्र शासन, प्राच्य विद्या, भाषाशास्त्र आदि विषयांचे ज्येष्ठ अभ्यासक व लेखक. **पत्ता** : आशा प्रिंटिंग प्रेस, माधव पेठ, मिरज ४१६ ४१०.

❖ **आ.ना. पेडणेकर** : इंग्रजीचे निवृत्त प्राध्यापक; लघुकथाकार, कवी व समीक्षक; टॉलस्टॉय यांच्या *वॉर अँड पीस* य अक्षर वाङ्मयकृतीचे संक्षिप्त भाषांतर *युद्ध आणि शांती* प्रसिद्ध. **पत्ता** : ६ अनुपमप्रभा, अमरसी रोड, मालाड (प.) मुंबई ४०० ०६४.



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून मे.पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




